# श्रीमद्भगवद्गीता 9वा अध्याय

राजविद्याराजगुह्य योग असे ह्या अध्यायाचे नाव असून त्यात 34 श्लोक आहेत.

**श्री भगवानुवाच**

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे। ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्।।9.1।।**

श्रीभगवानुवाच - अनसूयवे ते इदम् गुह्यतमम् विज्ञान-सहितम् ज्ञानम् तु प्रवक्ष्यामि यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे।

श्रीभगवानुवाच -

अनसूयवे मत्सरशून्य न असूयु पु. च. ए. व.

ते तुला युष्मद् च. ए. व.

इदम् हे नपुं द्वि. ए. व.

गुह्यतमम् गोपनीय गुह्यतम नपुं द्वि. ए. व.

विज्ञान-सहितम् अनुभवासहित विज्ञान विज्ञान-सहित नपुं द्वि. ए. व.

ज्ञानम् ज्ञान नपुं द्वि. ए. व.

तु परन्तु अव्यय

प्रवक्ष्यामि सांगतो प्र+वच् धातु कर्तरि लृट लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

यत् जे यद् नपुं द्वि. ए. व.

ज्ञात्वा जाणून ज्ञा धातु क्त्वा प्रत्यय

अशुभात् अमंगल अशुभ पु. पं. ए. व.

मोक्ष्यसे मुक्त होशील मुच् धातु कर्तरि लृट लकार परस्मैपद म. पु. ए. व.

ह्या अध्यायाचे नाव राजविद्याराजगुह्य म्हणजे सर्व प्रकारच्या रहस्यांमधील सर्वश्रेष्ठ असे रहस्य. आधीच्या म्हणजे 8 व्या अध्यायात भक्तीयोगाचे विवेचन करता करता शेवटच्या श्लोकात परम पद प्राप्त करणे म्हणजे नेमके काय त्याचे सूतोवाच केले होते. ते पूर्णपणे समजून घ्यायचे असेल तर भक्ती ला ज्ञानाची जोड द्यायलाच हवी. कोणतेही रहस्य ज्या व्यक्तीसमोर प्रकट करायचे असते, त्याची तशी पात्रताही असावी लागते. नवव्या अध्यायाच्या पहिल्याच श्लोकात ही पात्रता भगवंतांनी स्पष्ट केलेली आहे. जो असुयारहित, दोषदृष्टीरहित आहे, त्याला ही राजविद्या आणि राजगुह्य सांगितले जाते. खरे तर संपूर्ण गीतेमध्येच राजविद्या म्हणजेच ब्रह्मविद्या सांगितलेली असली तरी या अध्यायात भगवंतांनी स्वतःच 'मी राजविद्या सांगतो' असे म्हटलेले असल्याने त्याला एक वेगळे महत्त्व आहे! महाभारतात श्रीकृष्ण आणि अर्जुनाचे अनेक प्रकारचे नाते आहे जसे आतेमामे भावंड, अर्जुनाचे सुभद्रेशी लग्न, श्रीकृष्ण अर्जुनाचा सखा, सारथी आणि गुरू. इतक्या विविध प्रकारच्या नात्यांच्या पार्श्वभूमीवर श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणत आहेत की तुला माझ्या प्रती अजिबात इर्षेची भावना नाही. इथे अनसूयवे हा शब्द फारच महत्वाचा ठरतो.

'श्रद्धावान लभते ज्ञानम्' आणि 'संशयात्मा विनश्यति' हे तर सर्वश्रुत आहेच. असे म्हणतात की समाधी घेतेवेळी संत ज्ञानेश्वरांच्या ओठांवर नववा अध्याय होता. सहाजिकच मनात प्रश्न येतो की असे कोणते रहस्यमय ज्ञान असावे?

ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान ।

पाहावें आपणासि आपण । या नांव ज्ञान ॥ दासबोध पाचवे दशक समास सहावा श्लोक 1॥

ज्ञानाचे भंडार आपल्यासाठी खुले असते, त्यानंतर उलगडलेले ज्ञान ते आत्मज्ञान.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

तुला माझ्या बद्दल असूया नसल्याने,मी तुला गूढ असे विशेष ज्ञान सांगतो जे जाणून घेतल्यानंतर तुला अशुभ अशा (पापी, दुःखाने भरलेल्या) संसारातून मुक्ति मिळेल.

---

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम्। प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम्।।9.2।।**

इदम् राज-विद्या, राज-गुह्यम्, पवित्रम्, उत्तमम्, प्रत्यक्ष-अवगमम्, धर्म्यम्, कर्तुम् सुसुखम् अव्ययम्।

इदम् हे इदम् नपुं प्र. ए. व.

राज-विद्या राजन् विद्या स्त्री. प्र. ए. व.

राज-गुह्यम् राजन् गुह्य नपुं. प्र. ए. व.

गुह्य गूढ

पवित्रम् पवित्र पुं. प्र. ए. व.

उत्तमम् उत्तम नपुं. प्र. ए. व.

प्रत्यक्ष-अवगमम् प्रत्यक्ष-अवगम नपुं. प्र. ए. व.

प्रति अक्ष प्रत्यक्ष डोळ्यांनी (ज्ञान चक्षू)

अव +गम् धातु समजणे

धर्म्यम्, नैतिक

धर्म यत् प्रत्यय धर्म्य पुं. द्वि. ए. व.

कर्तुम् कृ धातू करणे तुमुन प्रत्यय

सुसुखम् सुलभ सुसुख नपुं. प्र. ए. व.

अव्ययम् अविनाशी अव्यय पु. प्र. ए. व.

विद्येचे महत्व आपण जाणतो.

विद्यां ददाति विनयं विनयाद् याति पात्रताम् । पात्रत्वात् धनमाप्नोति धनात् धर्मं ततः सुखम् ॥ हितोपदेश 6।। ज्ञानामुळे व्यक्ति विनम्र होते विनम्रताने पात्रता उत्पन्न होते, पात्रतेने धन आणि समृद्धि. समृद्धि ने योग्य आचरण, आणि योग्य आचरणाने संतुष्टता.

ह्या श्लोकात राजविद्या आणि राजगुह्य (गूढ) असे शब्द वापरले आहेत.

राज ह्या शब्दाचा अर्थ सर्वोच्च पातळी दर्शवतो. राजविद्या आणि राजगुह्य ह्या दोन्हीचा नक्की अर्थ तरी काय?

दोन प्रकारच्या विद्यांचा उल्लेख मुण्डकोपनिषद् मधे सापडतो. परा आणि अपरा

द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च ॥मुण्डकोपनिषद् 1.1.4 ॥

तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति । अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ मुण्डकोपनिषद् 1.1.5॥

आपले 4 वेद आणि 6 वेदांग शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद, नक्षत्र, वास्तु, आयुर्वेद, कर्मकांड ह्या सर्व अपरा विद्या.

गीतेमध्ये पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार ह्यांना अपरा शक्ति म्हटले आहे.

श्री शंकराचार्य जीं नी प्रश्नोपनिषद् मधे अपरा विद्ये बददल असे भाष्य केले आहे.

'अपरा विद्या गोचरं संसारं व्याकृतविषयं साध्य साधन लक्षणं अनित्यम्।'

हि विद्या जीवनमरणाच्या चक्रातून मुक्ति देत नाही.

ह्या सर्वांच्या पलिकडे असणारी परा विद्या, पारलौकिक.

परा यया तदक्षरमधिगम्यते।' (1/1/5)

मुण्डकोपनिषद्

ज्याच्या द्वारे अविनाशी ब्रह्म चे ज्ञान होते तीच परा विद्या.

शरीर नाशवंत आहे, आत्मा शाश्वत आहे. तरीही शरीरशास्त्र आपल्याला शिकता येते मात्र आत्म्याबद्दल कोणी शिकवू शकत नाही. त्याचा फक्त अनुभव घ्यायचा असतो.

राजविद्या म्हणजे आत्मज्ञान, ती प्रत्यक्षावगमं आहे म्हणजे प्रत्यक्षानुभूती देणारी आहे.

श्रीभगवानकृष्ण ह्या श्लोकात असे म्हणत आहेत की

ही अत्यंत गोपनीय अशी सर्वोच्च, अतिशय पवित्र, उत्तम, स्वतःच्या अनुभवातून समजून घेण्यासारखी, नैतिक (धर्मयुक्त) शिकण्यास सुलभ आणि कधीही वाया न जाणारी अशी विद्या आहे.

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यस्य परन्तप। अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि।।9.3।।**

हे परन्तप! अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः पुरुषाः माम अप्राप्य मृत्युसंसारवर्त्मनि निवर्तन्ते।

हे परन्तप!

अस्य ह्या इदम् पु. ष. ए. व.

धर्मस्य धर्माचे धर्म पु. ष. ए. व.

अश्रद्दधानाः श्रद्धाहीन

न श्रद्दधान पु. प्र. ब. व.

पुरुषाः पुरुष पुरुष पु. प्र. ब. व.

माम मला अस्मद् द्वि. ए. व.

अप्राप्य प्राप्त न होऊन न+प्र+आप् धातु ल्यप प्रत्यय

मृत्युसंसारवर्त्मनि जन्ममृत्यू च्या मार्गावर मृत्युसंसारवर्त्मन् नपु. स. ए. व.

निवर्तन्ते परत येत राहतात नि+वृत् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

आधीच्या श्लोकात राजविद्या अतिशय गोपनीय आहे असे म्हटले होते. त्यावेळी सर्पाच्या डोक्यावर ठेवलेल्या माणकाच्या गोष्टीची आठवण झाली. ब्रह्मविद्या अशीच आपल्या पाच कोषांच्या (अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय) आत दडलेली आहे. सर्व आवरणे भेदून तिचा अनुभव घ्यायचा आहे. मनोमय कोषात राग-द्वेष, काम क्रोध लोभ मोह मद मत्सर असूया कपट सर्व काही दडलेले आहे. मनाच्या पलिकडे बुद्धी, आणि बुद्धी मध्ये कर्तृत्व भावना आणि अहंकार. ह्या अहंकाराच्या पलिकडे अज्ञान. हे ज्याला समजले तो ज्ञानी. असे स्वस्वरूपाचे ज्ञान म्हणजे धर्म. धारयति इति धर्मः।

अशा ह्या ब्रह्मज्ञानचे फळ शाश्वत आहे, नित्य अविनाशी असे आहे. श्रद्धावान् लभते ज्ञानं।। 4.39 असे आधीच सांगितले आहे.

सात्विक्याध्यात्मिकी श्रद्धा कर्मश्रद्धा तु राजसी।

तामस्यधर्मे या श्रद्धा मत्ससेवायां तु निर्गुणा ॥ श्रीमद्भागवतम् 11.25.27।।

अध्यात्मिक श्रद्धा सात्विक, कर्म विषयी श्रद्धा राजसी आणि अधर्मी श्रद्धा तामसी असते. माझ्या (श्रीभगवानकृष्ण) सेवेत जी श्रद्धा आहे ती निर्गुण आहे.

पण ज्ञानावर श्रद्धाच नसेल तर काय?

सस्यमिव मर्त्यः पच्यते सस्यमिवाजायते पुनः।कठोपनिषद् ।1.1.6।।

धान्य मरणापूर्वी आपले बीज जमिनीत रुजवते आणि पुन्हा जन्माला येते.

पराचः कामाननुयन्ति बालास्ते मृत्योर्यन्ति विततस्य पाशम्। कठोपनिषद् ।2.1.2।।

बालबुद्धी असणारे विषयभोगात रममाण होतात आणि (जन्म) मृत्यू च्या पाशात अडकतात.

ह्या श्लोकाचे भाषांतर करताना पर्यावरणीय प्राणी चक्राची प्रकर्षाने आठवण येते. सर्व प्राण्यांची जीवनसाखळी एकमेकांवर अवलंबून आहे. दुर्दैवाने मानवाला कोणतीच जबाबदारी दिलेली नाही. तरीही आपल्याला बुद्धी देऊन का पाठवले आहे हा प्रश्न अनुत्तरित आहे. कारण आपण ती बुद्धी पर्यावरणाचा नाश करण्यासाठी वापरून पर्यायाने इतर प्राण्यांचे जीवन उद्ध्वस्त करतो. मला आश्चर्य वाटते भारतीय तत्त्वज्ञानात पुन्हा पुन्हा जन्म घेत बसण्यापेक्षा मुक्ती मिळवण्याचा उपदेश केला आहे. केवढी ही दूरदृष्टी.

आधीच्या श्लोकात आपण राजविद्येची विविध लक्षणे वाचली त्यामधील प्रत्यक्ष-अवगमम् ह्या लक्षणांचा जास्त खोलात जाऊन विचार केला की ह्या श्लोकाचा अर्थ मनाला जास्त पटेल.

कोणतीही गोष्ट करताना आपले मन त्याच्यात नसेल तर ती नीट जमत नाही.

आपली ज्ञानेंद्रिये, कर्मेन्द्रिये सर्व काही मनाच्या ताब्यात असतात. शेजारच्या माणसाचे बोलणे आपल्याला ऐकू सुद्धा येत नाही जर आपले लक्ष नसेल तर. आपण म्हणतो, परत सांग माझे लक्ष नव्हते.

ईथे तर अत्यंत गोपनीय अशी राजविद्या शिकायची आहे. राजविद्या आणि ती प्राप्त करून घेणाऱ्याची पात्रता ह्यालाच धर्म असा उल्लेख केला आहे.

आयुष्यात बऱ्याच गोष्टी आपण केवळ विश्वास ठेवून करतो, प्रत्येक गोष्ट आपल्याला स्वतः च्या डोळ्यांनी बघणे शक्य नसते. बायबल मध्ये सुद्धा असे म्हटले आहे.

We walk by faith, and not by sight.” (2 Corinthians 5:7)

श्रीभगवानकृष्ण ह्या श्लोकात असे म्हणतात की

हे परन्तप! ज्या लोकांची आपल्या धर्मावर श्रद्धा नसते, विश्वास नसतो, ते मला प्राप्त करू शकत नाहीत. आणि जन्म मृत्यू च्या मार्गावर ते परत परत चालत राहतात.

---

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना। मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः।।9.4।।**

अव्यक्त-मूर्तिना मया इदम् सर्वम् जगत् ततम् । सर्व-भूतानि च मत्-स्थानि अहम् तेषु न अवस्थितः ।

अव्यक्त-मूर्तिना निराकार अव्यक्त-मूर्ति पुं. तृ. ए. व.

मया माझ्या कडून अस्मद् तृ. ए. व.

इदम् हे इदम् नपुं. द्वि. ए. व.

सर्वम् सर्व नपुं. द्वि. ए. व.

जगत् जगत् नपुं. द्वि. ए. व.

ततम् व्यापलेले तत् नपुं. प्र. ए. व.

सर्व-भूतानि सर्व सजीव सर्व-भूत नपु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

मत्-स्थानि माझ्या अंतर्गत अस्मद् +स्थ नपुं. प्र. ब. व.

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

तेषु त्यामधे तद् स. ब. व.

न अव्यय

अवस्थितः स्थित अव+स्था धातु क्त प्रत्यय पुं. प्र. ए. व.

शास्त्रीय जगात एखादा सिद्धान्त मांडायचा असेल तर त्याचे पुरावे द्यावे लागतात. त्यासाठी शास्त्रोक्त पद्धतीने त्याचा अभ्यास करावा लागतो. भारतीय तत्त्वज्ञानात सुद्धा कोणत्याही विषयाचे ज्ञान प्राप्त करण्यासाठी पाच पद्धती सांगितल्या आहेत जसे 1. प्रत्यक्ष, 2. अनुमान, 3.उपमान, 4. अर्थापत्ती आणि 5. अनुपलब्धि.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी स्वतः च्या अव्यक्त स्वरूपाचा उल्लेख केला आहे. म्हणजेच ते वर सांगितलेल्या पद्धतीने सिद्ध करता येत नाही.

न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो

न विद्मो न विजानीमः यथैतदनुशिष्यात्। केनोपनिषद् । 1. 3.।।

तेथे दृष्टि जात नाही, न वाणी, न मन. आम्ही ह्या मधील भेद समजू शकत नाही आणि आम्ही आमच्या शिष्यांना हे कसे दाखवावे ते माहित नाही.

यन्मनसा न मनुते येनाऽहुर्मनो मतम्। तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ केनोपनिषद् ।1.5।।

जे मनाने चिंतन करता येत नाही पण ज्याच्यामुळे मनाला चिंतन करण्याची शक्ती मिळते, तेच ब्रह्म स्वरूप. ज्या मूर्त स्वरूपाची उपासना केली जाते ते ब्रह्म स्वरूप नव्हे.

ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत्। ईशावास्योपनिषद। 1।।जगामध्ये जे काही जड चेतन जगत् आहे ते सर्व स्वतः च ईश्वराने व्यापलेले आहे.

मायाशक्ती-युक्त असणे आणि मायाशक्ती च्या प्रभावाखाली असणे ह्यामधील नेमका फरक ह्या श्लोकात समजून घेता येतो.

हें अव्यक्तपणें थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिजलें ।

तैसें अमूर्तमूर्ति मियां विस्तारलें । त्रैलोक्य जाणें ॥ज्ञानेश्वरी ।9.66॥

हे अव्यक्तपणाने थिजलेले (सूक्ष्म ) असते, तेच मग विश्वाच्या आकाराने पातळ होते (व्यापून राहते). या रीतीने अव्यक्तरूप असलेला मी त्रैलोक्याच्या रूपाने विस्तार पावतो असे समज. ॥9.66॥

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

माझे अव्यक्त असे रूप सर्व विश्वात व्यापलेले आहे. सर्व जीव माझ्यात वसलेले आहेत पण ही भूते म्हणजे माझी रूपे नाहीत.

---

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्। भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः।।9.5।।**

न च भूतानि मत्-स्थानि मे ऐश्वरम् योगम् पश्य । भूत-भृत् भूत-भावनः मम आत्मा च भूत-स्थः न। ।

न अव्यय

च सुद्धा अव्यय

भूतानि सजीव भूत नपुं. प्र. ब. व.

मत्-स्थानि माझ्यात स्थिरावलेले अस्मद् स्था नपुं. प्र. ब. व.

मे मला अस्मद् ष. ए. व.

ऐश्वरम् ईश्वरीय ऐश्वर ईश्वर +अण् प्रत्यय पु. द्वि. ए. व.

योगम् योग पुं. द्वि. ए. व.

पश्य पहा दृश् धातु कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

भूत-भृत् भूत-भृत् पुं. प्र. ए. व.

विष्णू चे नाव, सर्वांचे पोषण करणारा

भूत-भावनः भाव निर्माण करणारा भूत-भावन पुं. प्र. ए. व.

मम माझा अस्मद् ष. ए. व.

आत्मा आत्मन् पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

भूत-स्थः भूतांमधे स्थित भूत-स्थ पुं. प्र. ए. व.

न अव्यय

आधीच्या श्लोकात सर्व भूते माझ्या मध्ये आहेत पण मी त्यांच्या मध्ये नाही असे भगवंतांनी म्हटले होते. आता ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण तर असे म्हणतात की सर्व भूते माझ्यामध्ये नाहीत. आता हे कसे समजून घ्यायचे?

कदाचित ह्या श्लोकामुळे द्वैताचा सिद्धान्त सांगितला असावा. येथे सर्व भूते म्हणजे सामान्य माणसे असाच अर्थ अपेक्षित आहे. तेल आणि पाणी एकत्र राहू शकतात पण त्यांचा संयोग होत नाही. असे असेल तर कार्यकारणसंबंध कसा प्रस्थापित करायचा?

यतो वा इमानि भूतानि। यथोचित वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति. यत्प्रयन्तिभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद् ब्रह्मेति।तैत्तीरीय उपनिषद।3.1.2।।

ज्याच्या पासून ही भूते निर्माण झाली, ज्याच्यामुळे हे जिवंत राहतात, हे जग सोडून जाताना ते ज्यांच्यात प्रवेश करतात ते जाणून घेण्याची तू इच्छा कर.

मी सर्व भूतांचा आश्रय आहे. जसे लोखंडी पट्टी आगीत तापवली असता, अग्नी चे गुण लोखंडात उतरतात पण अग्नी मध्ये लोहाचे गुण दिसत नाहीत. म्हणजे जोपर्यंत माणूस मायाशक्तीच्या प्रभावाखाली असतो तोपर्यंत त्याच्यात आणि परमात्म्यामधे फरक असणारच. स्वयंप्रकाशित सूर्याचे सुद्धा असेच उदाहरण देता येईल. सूर्यप्रकाशाशिवाय पृथ्वीवरील जीवन अशक्य पण पृथ्वी तत्त्वाची सूर्याला गरज नाही. सर्प रज्जू न्याय आपल्याला माहीत आहे. एक दोरी सापाचा आभास निर्माण करू शकते. ह्याच न्यायाने हे जग म्हणजे केवळ आभास.

“ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या”

म्हणूनच ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला सांगत आहेत की माझे विलक्षण योग सामर्थ्य जाणून घे.

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि। संपश्यन्ब्रह्म परमं याति नान्येन हेतुना॥ कैवल्योपनिषद् ।10।।सर्व प्राणीमात्रात वास करणाऱ्या आत्म्याला, आणि आत्म्याच्या ठिकाणी सर्व प्राणीमात्र पाहून तो श्रेष्ठ ब्रह्माला प्राप्त होतो अन्य मार्गाने नाही.

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि।

एकक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः।।6.29।।

समदर्शी योगयुक्त असा, सर्वत्र सर्व सजीवांमधे परमात्मा आणि परमात्म्याला सर्व सजीवांमधे पाहतो.

म्हणून

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

मी जरी (जगाचा) निर्माण करणारा असलो तरी सर्व काही माझ्यात स्थिरावलेले नाही, तू माझे हे योगसामर्थ्य बघ. माझा आत्मा सुद्धा ह्या जीवितांमधे स्थिरावलेला नाही.

---

**यथाऽऽकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान्। तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय।।9.6।।**

यथा सर्वत्रगः महान् वायुः नित्यम् आकाश-स्थितः, तथा सर्वाणि भूतानि मत्-स्थानि इति उपधारय।

यथा जसे अव्यय

सर्वत्रगः सर्व गामी सर्वत्र गः पुं. प्र. ए. व.

महान् महत् पुं. प्र. ए. व.

वायुः वायु पुं. प्र. ए. व.

नित्यम् सदैव नित्य नपुं. द्वि. ए. व.

आकाश-स्थितः आकाशात स्थिरावलेला आकाश-स्थित पुं. प्र. ए. व.

तथा तसे अव्यय

सर्वाणि सर्व नपुं. प्र. ब. व.

भूतानि सजीव भूत नपुं. प्र. ब. व.

मत्-स्थानि माझ्या ठायी अस्मद् स्था नपुं. प्र. ब. व.

इति असे अव्यय

उपधारय समजून घे उप+धृ धातु कर्तरि लोट लकार परस्मैपद म. पु. ए. व.

वायू आकाशात पूर्णपणे भरून गेलेला आहे. त्याची हालचाल झाली तरच त्याचे अस्तित्व आपल्याला जाणवते. त्याच प्रमाणे सजीवांचे अस्तित्व अनित्य आहे असे म्हटले तर ईश्वराचेच अस्तित्व सगळीकडे व्यापून गेले आहे. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी स्वतः च्या अस्तित्वाला वायू ची उपमा दिली आहे.

मत्स्थानि (माझ्यात स्थिरावलेले) ह्या शब्दाचा सुद्धा पुनरुच्चार केला आहे.

सर्व जीवांसाठी प्राणवायू, पाणी अन्न हे जगण्यासाठी अती महत्वपूर्ण.

शास्त्रिय सत्य असे कि माणूस काही दिवस अन्नाशिवाय नुसत्या पाण्यावर जगू शकतो.

साधारण 24 तास पूर्ण पाण्याशिवाय तग धरू शकतो पण श्वास हा घ्यावाच लागतो.

आपली जीवसृष्टी कशी निर्माण झाली? एक पेशिय वनस्पति आणि  छोटे जीव (algae and cyanobacteria) आधी निर्माण झाले. त्यांनी ऑक्सिजन ची निर्मिती केली आणि त्यामुळेच इतर जीव निर्माण होऊ शकले.

बाळाचा जन्म होतो म्हणजेच त्या वेळी तो पहिला श्वास घेतो.

फुलातील परागकण वायू च्या साह्याने वाहतात.

पाण्यात जर ठराविक ऑक्सिजन चे प्रमाण नसेल तर त्याला मृतपाणी मानतात.

झाडे सुद्धा आॅक्सिजन शिवाय जगू शकत नाहीत कारण ते आपले अन्न तयार करू शकत नाहीत.

असा एक विचार मनात येतो की आपला आत्मा वायू रुप असावा का? कारण तो दिसत नाही पण वायू प्रमाणेच त्याचे अस्तित्व असते.

वायूला अध्यात्मिक अर्थ सुद्धा प्राप्त झाला आहे.

जसे ऋग्वेदातील "पुरुष सूक्तात असे वर्णन आहे

"चन्द्रमा मनसो जाताश्चक्षो सूर्यो अजायत। श्रोत्रांवायुश्च प्राणश्च मुखादग्निरजायत।"पुरुष सूक्त 12।।

परमात्मा रुपी पुरुषाच्या मना पासून चंद्र, डोळ्यापासून सूर्य, श्रवणेंद्रिय पासून वायू आणि प्राण, मुखापासून अग्नी निर्माण झाला.

वायुर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव।

एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥ कठोपनिषद् । 2.2.10।।

ज्या प्रकारे वायू चा ह्या जगात प्रवेश झाला आणि तो जेथे जेथे शिरला त्याप्रमाणे निरनिराळी रुपे त्याने धारण केली त्याप्रमाणेच समस्त प्राणीमात्रातील अंतरात्मा एकच असला तरी तो निरनिराळी रूपे धारण करतो.

ऋग्वेदात वायूला मुख्य देव मानले आहे.

म्हणून श्रीभगवान असे म्हणतात की

ज्याप्रमाणे शक्तिशाली वायू हा सदैव आसमंतात स्थित आहे त्याप्रमाणे सर्व जीव माझ्यात स्थिरावलेले आहेत.

---

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम्। कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम्।।9.7।।**

हे कौन्तेय! कल्प-क्षये सर्व-भूतानि मामिकाम् प्रकृतिम् यान्ति । कल्प-आदौ अहम् तानि पुनः विसृजामि।

हे कौन्तेय!

कल्प-क्षये कल्पाच्या अंताला कल्प-क्षय पु. स. ए. व.

सर्व-भूतानि सर्व जीव सर्व-भूत नपुं. प्र. ब. व.

मामिकाम् माझी मामिका स्त्री. द्वि. ए. व.

प्रकृतिम् प्रकृति स्त्री. द्वि. ए. व.

यान्ति प्राप्त होतात या धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

कल्प-आदौ कल्प च्या सुरवातीला कल्प-आदि पुं. स. ए. व.

अहम् अस्मद् प्र. ए. व.

तानि त्यांना तद् नपुं. प्र. ब. व.

पुनः पुन्हा अव्यय

विसृजामि निर्माण करतो वि+सृज् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

8व्या अध्यायातील 17 व्या श्लोकात कल्प ह्या संकल्पनेत बद्दल विस्ताराने लिहिले आहे. ब्रह्मा चा एक दिवस म्हणजे कल्प आणि एक रात्र म्हणजे कल्प.

अव्यक्तादिनि भूतानि व्यक्तिमध्यानि भारत |

अव्यक्तनिधानन्येव तत्र का परिदेवना || 2.28

सर्व भूत मात्रे जन्मापूर्वी आणि मृत्यू नंतर अव्यक्त असतात फक्त मधल्या काळात व्यक्त असतात मग त्यासाठी शोक का करायचा?

मुण्डकोपनिषद् मध्ये आपण जागृत आणि स्वप्न अवस्था ह्या व्यक्त स्वरूपात तर सुषुप्ती अवस्था अव्यक्त असते असे वाचले आहे.

सातव्या अध्यायात आपण परा आणि अपरा प्रकृती बद्द्ल वाचले आहे.

8व्या अध्यायातील 19 व्या श्लोकात आपण नित्य प्रलय, नैमित्तिक प्रलय आणि प्राकृतिक प्रलय ह्या बद्दल वाचले आहे. ह्या सृष्टीची व्युत्पत्ती कशी झाली? येथे सर्वात पहिला कोणता जीव अस्तित्वात आला, ह्यावर खूप संशोधन झाले आहे. पृथ्वीवर होऊन गेलेली हिमयुगे आपल्याला माहीत आहेत.

ह्या श्लोकात प्राकृतिक प्रलया बद्दल लिहिले आहे. श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे कौन्तेय!

कल्पाच्या शेवटी सर्व जीव माझ्याकडे परत येतात आणि कल्पाच्या सुरुवातीला मी त्यांना परत ह्या जगात आणून सोडतो.

---

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः। भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात्।।9.8।।**

स्वाम् प्रकृतिम् अवष्टभ्य प्रकृतेः वशात् अवशम् इमम् कृत्स्नम् भूत-ग्रामम् पुनः पुनः विसृजामि।

स्वाम् माझी स्वा स्त्री. द्वि. ए. व.

प्रकृतिम् प्रकृति स्त्री. द्वि. ए. व.

अवष्टभ्य अंगिकार करून

अव +स्तम्भ् धातु स्तब्ध असणे ल्यप प्रत्यय

प्रकृतेः प्रकृति च्या स्त्री. ष. ए. व.

वशात् स्वाधीनता वश पुं. पं. ए. व.

अवशम् ताब्यात न ठेवण्यासारखे न वश पुं. द्वि. ए. व.

इमम् ह्या इदम् पुं. द्वि. ए. व.

कृत्स्नम् सर्व कृत्स्न नपुं. द्वि. ए. व.

भूत-ग्रामम् जीवांचा गाव (समूह) भूत-ग्रामः पु. द्वि. ए. व.

पुनः पुनः पुन्हा पुन्हा अव्यय

विसृजामि रचतो वि +सृज धातु रचना करणे कर्तरि लट्लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी पुनर्निर्मिती चे सूतोवाच केले होते. ह्या श्लोकातील पुनः पुनः हे शब्द प्रकृती चे अनादि वैशिष्ट्य दर्शवतात. प्रकृती म्हणजे ब्रह्माची त्रिगुणात्मक शक्ती.

एष सर्वेश्वरः एष सर्वज्ञ एषोऽन्तर्याम्येष योनिः सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम् ॥ माण्डुक्योपनिषद्। 6।।

हा परमात्मा सर्वेश्वर सर्वज्ञ, अन्तर्यामी, संपूर्ण जगताचे कारण आणि समस्त प्राण्यांच्या उत्पत्ती, स्थिती आणि प्रलयाचे स्थान आहे. ह्या श्लोकात ईश्वर निसर्ग (प्रकृति) आणि जीवसृष्टी ह्यांचा परस्पर संबंध दर्शविला आहे. स्वतः परमात्मा निराकार निर्गुण निर्विशेष आणि निरुपाधिक असला तरी हे विश्व सगुण साकार सोपाधिक सावयव असे निर्माण करण्यामागचे कारण श्रीभगवानकृष्णांनी ह्या श्लोकात सांगितले आहे. ते असे म्हणतात की मी प्रकृतीला वश करून विश्वाची रचना करतो.

प्रकृतिला माया जगत असे आधीच्या श्लोकात म्हटले आहे. ह्या जगात तीन गुणांचे वर्णन केले आहे. सत्त्व रज आणि तम.

प्रकृतिला निर्माण करणारा तो ईश्वर. ज्याचा ह्या प्रकृति वर पुर्ण ताबा आहे.

पण प्रकृतिला सुद्धा काही अधिकार दिले आहेत, स्वायत्तता दिली आहे. प्रकृति जीवसृष्टी निर्माण करते तीनगुणांचा वापर करून. कोणत्या सजीवांमधे कोणते गुण प्राबल्याने दिसून येतील ते प्रकृतीच ठरवणार आणि जीवात्मा पुन्हा पुन्हा जन्म घेत राहणार.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की मी माझ्या अधिपत्याखाली असणाऱ्या प्रकृति मधे पुन्हा पुन्हा सर्व जीवात्म्यांचे अस्तित्व निर्माण करतो जे प्रकृती नियंत्रित, परस्वाधीन आहेत.

---

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय। उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु।।9.9।।**

हे धनञ्जय! तेषु कर्मसु असक्तम् उदासीनवत् च आसीनम् माम् तानि कर्माणि न निबध्नन्ति।

हे धनञ्जय!

तेषु ती तद् नपुं. स. ब. व.

कर्मसु कर्मे कर्मन् नपुं. स. ब. व.

असक्तम् न जोडलेली असक्त पु. द्वि. ए. व.

अ+सक्त सञ्ज् धातु जवळीक असणे

उदासीनवत् आहे त्या पेक्षा थोडे वर (अंतर राखून) अव्यय

उत् +आसीन आस् धातु बसणे

च आणि अव्यय

आसीनम् बसलेला आस् धातु शतृ प्रत्यय पु. द्वि. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

तानि ती तद् नपुं. द्वि. ए. व.

कर्माणि कर्मे कर्मन् नपुं. द्वि. ए. व.

न अव्यय

निबध्नन्ति बांधून घेणे नि+बन्ध् धातु बांधणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

एक महत्त्वाचा विचार ह्या श्लोकात सांगितला आहे. परमात्म्याला कर्म बंधन नसते. परमेश्वरानेच हे जग निर्माण केले. त्रिगुणात्मक प्रकृती निर्माण केली. 4थ्या अध्यायात आपण धर्माचे रक्षण करण्यासाठी परमेश्वर पुन्हा पुन्हा जन्म घेतात असे वाचले आहे. मग त्याचे कर्मफळ का मिळत नसावे असा प्रश्न सहाजिकच मनात येतो. आधीच्या दोन श्लोकात जीवसृष्टीच्या निर्मिती बद्दल कथन करून त्यांचा, त्याच्या प्रक्रियेतील सहभाग श्रीभगवानकृष्णांनी स्पष्ट केला. प्रत्येक आत्म्याच्या कर्मानुसार त्याला निरनिराळे शरीर मिळत जाते असे आपण मानतो. ब्रह्मा विष्णू महेश ह्यांचे एकत्रित प्रयास त्यांना लक्ष्मी सरस्वती ह्यांनी दिलेली साथ ह्या सर्वांमध्ये निर्मिती चे चक्र चालू राहते. ह्या सर्वांमध्ये श्रीभगवंतांचा वैयक्तिक स्वार्थ काहीच नाही. स्वतः च निर्माण केलेल्या सृष्टीमध्ये अधर्म का निर्माण व्हावा? हा एक प्रश्न.

त्याला कारणीभूत तामसी वृत्ती असे म्हणता येईल.

पण तो निस्तरण्यासाठी स्वतः भगवंतांना का जन्म घ्यावा लागतो हा दुसरा प्रश्न.

ह्याचे उत्तर मी माझ्या परीने देते.

अधर्माच्या विरूद्ध किती वाकड्यात जायचे हा प्रश्न अर्जुनाला पडला होता. कारण युद्धामुळे होणारी हानी त्याला जास्त त्रासदायक वाटत होती. सद्गुणी माणसे एका विशिष्ट पातळीच्या पलिकडे विरोध करू शकत नाहीत. ते त्यांची सहनशक्ती वाढवतात पण दुष्टांच्या क्रौर्याला काहीच सीमा नसते. अशा वेळी सज्जनांना प्रेरीत करण्यासाठी अवतार घेणे आवश्यक असावे. त्यायोगे परमेश्वर सुद्धा आपले अस्तित्व दाखवून देऊ शकतात.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे धनञ्जय! ह्या सर्व कर्मांपासून मी अगदीच अनासक्त, उदासीन असतो आणि मी त्या कर्मांपासून अलिप्त सुद्धा असतो.

---

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्। हेतुनाऽनेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते।।9.10।।**

हे कौन्तेय! अध्यक्षेन मया प्रकृतिः सचर-आचरम् सुयते, अनेन हेतूना जगत् विपरिवर्तते।

हे कौन्तेय!

अध्यक्षेन निरीक्षणाने (नियंत्रणाने) अध्यक्ष पु. तृ. ए. व.

अधि+अक्ष+अच् प्रत्यय

मया माझ्या अस्मद् तृ. ए. व.

प्रकृतिः प्रकृति स्त्री. प्र. ए. व.

सचर-अचरम् चराचरसहीत सचर-अचर नपुं. द्वि. ए. व.

सुयते रचतात सू धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

अनेन ह्या इदम् पुं. तृ. ए. व.

हेतुना हेतूने हेतु पुं. तृ. ए. व.

जगत् जगाचे जगत् नपुं. प्र. ए. व.

विपरिवर्तते परिवर्तन होते वि+परि+वृ धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

हि सृष्टी कशी निर्माण झाली ह्याचे कदाचित शास्त्रीय कारण सांगता येईल पण ती का निर्माण झाली ह्याचे उत्तर काय देणार? त्यासाठी शास्त्राचा आधार सोडून तुम्हाला तात्विक मिमांसेचा आधार घ्यायची वेळ येतेच.

ह्या श्लोकात अध्यक्ष असा समर्पक शब्द श्रीभगवानकृष्णांनी स्वतः साठी वापरला आहे. अध्यक्ष म्हणजे सर्वांवर नियंत्रण ठेवणारा कर्मविपाक सिद्धांत ह्या सिद्धांताला पुरस्कृत करणारा हा श्लोक.आधीच्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी सांगून टाकले की प्रकृति च्या आणि जीवसृष्टी च्या निर्मिती मध्ये त्यांचा वैयक्तिक स्वार्थ काहीच नसतो आता पुढे जाऊन ते असे स्पष्ट करताना दिसतात कि

जरी त्यांना वैयक्तिक स्वारस्य नसले तरी सर्व ठिकाणी त्यांची देखरेख मात्र आहे. सर्व गोष्टींकडे त्यांचे पूर्ण लक्ष आहे.

विपरिवर्तन हा शब्द या श्लोकात महत्वपूर्ण. आधीच्या अध्यायांमधे निर्मिती आणि प्रलय ह्या गोष्टी आपण समजावून घेतल्या. 84 लक्ष जीवांचे वैविध्य माहिती करून घेतले. म्हणूनच ह्या श्लोकात ते असे म्हणतात की

हे कौन्तेय! हि सर्व चर अचर सृष्टि माझ्याच अधिपत्याखाली परिवर्तित (प्रकट, प्रलय) असते.

---

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्। परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्।।9.11।।**

मम परम् भावम् अजानन्तः मूढाः मानुषीम् तनुम् आश्रितम् माम् भूत-महेश्वरम् अवजानन्ति।

मम माझे अस्मद् ष. ए. व.

परम् श्रेष्ठ पर पुं. द्वि. ए. व.

भावम् भाव पुं. द्वि. ए. व.

अजानन्तः न जाणणारे न+ज्ञा धातु शतृ प्रत्यय पुं. प्र. ब. व.

मूढाः मूर्ख लोक मूढ पुं. प्र. ब. व.

मानुषीम् मानवीरूप मानुषी स्त्री. द्वि. ए. व.

तनुम् शरीर तनु स्त्री. द्वि. ए. व.

आश्रितम् धारण केलेल्या आङ्ः +श्रि धातु क्त प्रत्यय पुं. द्वि. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

भूत-महेश्वरम् सजीवांमधे महान ईश्वर भूत-महत् ईश्वर पुं. द्वि. ए. व.

अवजानन्ति तुच्छ समजतात अव+ज्ञा धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

जळी, स्थळी काष्ठी, पाषाणी। देव वसला चराचरी।तुकाराम महाराज

हे जरी खरे असले तरी देव काही वेळा मनुष्य, प्राणी रुपात अवतार घेताना दिसतात. 9व्या श्लोकात आपण परमेश्वराच्या अवताराची चर्चा केली होती त्यापुढे प्रश्न असा की सर्वच सामान्य व्यक्तिंना परमेश्वराची हे रूप ओळखता येते का?

जे इया स्थूलदृष्टी वायां । जाइजेल गा ॥ ज्ञानेश्वरी 143॥

ईश्वराचे स्थूल दर्शन होत नाही त्यासाठी आत्मदृष्टी आवश्यक.

बरेचदा संकटकाळी असा अनुभव येतो कि आपल्या जवळच्या व्यक्ती कोणीच आजूबाजूला नसतात आणि कोणीतरी अनोळखी व्यक्ती आपल्याला मदत करते. नकळत आपण बोलून जातो, अगदी देवासारखा भेटलास. अशी अनुभूती बरेचदा होते. असे ईश्वराचे अस्तित्व प्रत्येकाला प्रत्येक वेळी समजेलच असे नाही.

महाभारतात ह्याचे उदाहरण द्यायचे झाले तर जेव्हा श्रीकृष्ण दुर्योधनाकडे पांडवांतर्फे शिष्टाई करण्यासाठी गेला असता, दुर्योधनाने श्रीकृष्णाला धुडकावून लावले. तेच जर ईश्वराचे रूप दुर्योधन समजू शकला असता तर इतका मोठा संहार टळला असता.

तीच गोष्ट शिशुपाल आणि कंसाची. शूर्पणखेला राम दिसले पण अजिबात समजून घेता आले नाहीत.

न जन्मलेले, मृत आणि मूर्ख ह्यामधे पहिले दोन सुसह्य असतात आणि मूर्ख पुन्हा पुन्हा मनःस्ताप देतात. असे सुभाषितकार म्हणतात.

म्हणून श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

माझा भूतांचा महेश्वर हा परम भाव न समजू शकणारे अल्प बुध्दी, मला मानवी रुपातच पाहतात आणि माझी अवज्ञा करतात.

---

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः। राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः।।9.12।।**

मोघ-आशाः मोघ-कर्माणः मोघ-ज्ञानः विचेतसः राक्षसीम आसुरीम च मोहिनीम प्रकृतिम एव श्रिताः।

मोघ-आशाः व्यर्थ आशा मोघ-आश पुं. प्र. ब. व.

मोघ निरर्थक मुह् धातु +घञ् प्रत्यय

मोघ-कर्माणः व्यर्थ कर्म मोघ-कर्मन् पुं. प्र. ब. व.

मोघ-ज्ञानाः व्यर्थ ज्ञान  मोघ-ज्ञान पुं. प्र. ब. व.

विचेतसः विक्षिप्त चित्त वि+चेतस् पुं. प्र. ब. व.

राक्षसीम राक्षसी स्त्री. द्वि. ए. व.

आसुरीम आसुरी स्त्री. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

मोहिनीम भूरळ मोहिनी स्त्री. द्वि. ए. व.

प्रकृतिम प्रकृति स्त्री. द्वि. ए. व.

एव नक्की अव्यय

श्रिताः धारण केलेले श्रि धातु सेवा करणे क्त प्रत्यय पुं. प्र. ब. व.

आधीच्या श्लोकात मूढ असा उल्लेख केला होता त्यासंदर्भात विस्तृत वर्णन ह्या श्लोकात दिले आहे.

असु म्हणजे इन्द्रिये. र म्हणजे तृप्त करणे. रक्षा+अस्, इन्द्रियभोगाच्या रक्षणासाठी दुसऱ्याची हिंसा करणारे ते राक्षस. प्रत्येक जीवाच्या अंतःकरणात आनंदस्वरूप परमात्मा जरी वास करत आहे तरी प्रत्येकाला त्याचा अनुभव करता येत नाही त्याला कारण त्यांच्या असुरी प्रवृत्ती. सहज म्हणून परिक्षण करायचे ठरवले तर देवळात येणाऱ्या प्रत्येकाच्या मनात नक्की काय भाव असतात बरे? काही अगदी मनापासून आलेले असतात. तर काही नुसते देऊळ बघायला. तर काही नुसता प्रसाद घेतात तर काही आलेल्या लोकांना बघत असतात. प्रत्येकाचे काय हेतू असू शकतात ते कळणे अवघड असते. देवाचे दर्शन घेणे आणि देवाची भेट होणे ह्यामध्ये बरेच मोठे अंतर आहे. देवाचे अस्तित्व जर समजणारच नसेल, तशी अनुभूती होण्याची काही पात्रताच नसेल तर देवदर्शनाचा फायदा तरी काय? आता ही पात्रता कशामुळे निर्माण होते? जे सन्मार्गाने चालतात जे व्यक्तिगत सुखाचा विचार न करता पुण्यकर्म करत राहतात त्याचे आयुष्य खरेच सुफळ झाले म्हणायचे.

पण जे स्वार्थी आहेत, ज्यांची अल्पबुद्धि आहे किंवा बुद्धि भ्रष्ट झाली आहे आजूबाजूच्या मोहमयी जगामुळे, त्यांनी केलेले कोणतेही कार्य अर्थहीन आहे. व्यर्थ आहे. ह्या सर्वाचा उल्लेख 7व्या अध्यायातील 24,25 व्या श्लोकात येऊन गेला आहे.

विद्या विवादाय धनं मदाय शक्तिः परेषां परपीडनाय।खलस्य साधोर्विपरीतमेतत् ज्ञानाय दानाय च रक्षणाय ॥

वाईट माणसे विद्या भांडण करण्यासाठी, धन गर्व करण्यासाठी आणि बळ दुसऱ्यांना त्रास देण्यासाठी वापरतात. सज्जन माणसांचे मात्र ह्याच्या एकदम विरुद्ध असते. विद्या ज्ञानदानासाठी, धन देण्यासाठी आणि बळ दुसऱ्यांच्या रक्षणासाठी असते.

म्हणूनच श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जे ह्या मोहमयी जगात, राक्षसी आणि आसुरी शक्तिंमधे गुरफटून गेले आहेत, ज्यांची बुद्धि अशी भ्रष्ट झाली आहे, त्यांची आयुष्यातील लक्ष्य, त्यांची कार्ये, त्यांचे ज्ञान सर्व काही व्यर्थ आहे.

---

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः। भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम्।।9.13।।**

हे पार्थ! दैवीम् प्रकृतिम् आश्रिताः महात्मानः तु माम् भूतादिम् अव्ययम् ज्ञात्वा, अनन्य-मनसः भजन्ति।

हे पार्थ!

दैवीम् दैवी स्त्री. द्वि. ए. व.

प्रकृतिम् प्रकृति स्त्री. द्वि. ए. व.

आश्रिताः अंगिकारणारे आङः प्रत्यय +श्रि धातु क्त प्रत्यय पुं. प्र. ब. व.

महात्मानः महात्मे महत् आत्मन् पुं. प्र. ब. व.

तु परन्तु अव्यय

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

भूतादिम् सजीवांचा (जनक) भूत आदि पुं. द्वि. ए. व.

अव्ययम् अविनाशी अव्यय पुं. द्वि. ए. व.

ज्ञात्वा जाणून ज्ञा धातु क्त्वा प्रत्यय

अनन्य-मनसः अनन्य भावाने अनन्य-मनस् पुं. प्र. ब. व.

भजन्ति भजतात भज् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

आधीच्या श्लोकात आसुरी आणि राक्षसी प्रवृत्तीच्या माणसांचे म्हणजेच रजोतमगुणांच्या प्रभावाखाली असणाऱ्यांचे वर्णन केले होते. ह्या श्लोकात महात्मा असा उल्लेख केला आहे, ज्याचे वर्णन भाष्यकार अक्षुद्रचित्ताः महात्मानः असे करतात. म्हणजे ज्यांचे मन अतिशय शुद्ध आणि विशाल आहे असे. 16 व्या अध्यायात दैवी आणि आसुरी संपत्तींचे विस्ताराने वर्णन केले आहे. दैवी संपत्ती बाळगणारे काम क्रोध

यासारखे दुर्गुण नष्ट करून शम दम इत्यादी गुणांचा आश्रय घेतात. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पार्थ! परन्तु ईश्वराला शरण गेलेले, दैवी गुण बाळगून असणारे महान लोक मला शाश्वत असा जीवसृष्टी चा प्रवर्तक मानून मला भजतात.

---

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः। नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते।।9.14।।**

यतन्तः दृढ-व्रताः सततम् कीर्तयन्तः च माम् नमस्यन्तः च नित्य-युक्ताः भक्त्या माम् उपासते।

यतन्तः प्रयास करताना

यत् धातू प्रयत्न करणे शतृ प्रत्यय पुं. प्र. ब. व.

दृढ-व्रताः दृढ संकल्प दृढ-व्रत पुं. प्र. ब. व.

सततम् निरंतर अव्यय

कीर्तयन्तः कीर्त शतृ प्रत्यय पुं. प्र. ब. व.

कृत् धातु प्रसिद्ध करणे. +भावे ल्युट्

च सुद्धा अव्यय

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

नमस्यन्तः वंदन करून

नम् धातु शतृ प्रत्यय (नमस्यत्) पुं. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

नित्य-युक्ताः निरंतर भक्ती

नित्य+युज् धातू जोडून घेणे क्त प्रत्यय पुं. प्र. ब. व.

भक्त्या मनोभावे भक्ती स्त्री. तृ. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

उपासते। देवाच्या जवळ जाणे उप +आस् धातू बसणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

नवविधा भक्ती मध्ये कीर्तन हा एक भक्तीचा प्रकार सांगितला आहे.

आपले मन हे वायू सारखे चंचल आहे. ईश्वराच्या गुणांचे श्रवण आणि गायन करून मन स्थिर करता येईल. भागवतात खाली दिलेल्या श्लोकात कली युगात कीर्तन करणे श्रेयस्कर असे म्हटले आहे.

कृते यद् ध्यायतो विष्णुं त्रेतायां यजतो मखैः।

द्वापरे परिचर्यायां कलौ तद्धरिकीर्तनात् ।।

श्रीमद्भागवतम्-12.3.52.

नाम-लीला-गुणदीनां उच्चैर भाषा तु कीर्तनम्।

भक्तिरसामृतसिंधु-1.2.145

देवाचे नाव, रूप, गुण, लीला यांचे गुणगान म्हणजेच कीर्तन.

कीर्तन ह्या शब्दाचा प्रचलित अर्थ न घेता त्याच्या मूळ धातु च्या अर्थाने ह्या कीर्तनाचा अर्थ समजून घ्यायला हवा. ज्या वस्तू ज्ञात आहेत त्यांचेच कीर्तन करता येते. वस्तु चा संबंध वास्तवतेची आहे. (वस् धातु वसणे) म्हणजेच ईश्वराचे कीर्तन करण्याआधी त्याला जाणून घेणे आवश्यक आहे.

आधीच्या श्लोकात महात्मा असा उल्लेख केला आहे त्या महान आत्म्याचे वर्णन  ह्या श्लोकात केलेले दिसते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

(असे महान लोक) निरंतर माझे किर्तन करत, दृढ संकल्प पूर्णत्वास नेण्याचा प्रयत्न करत, मला नमस्कार करून भक्तिभावाने माझ्या जवळ येण्याचा प्रयत्न करतात.

---

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते। एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम्।।9.15।।**

अन्ये अपि ज्ञान-यज्ञेन यजन्तः एकत्वेन, पृथक्त्वेन च, विश्वतोमुखम् माम् बहुधा उपासते।

अन्ये इतर अन्य पुं. प्र. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

ज्ञान-यज्ञेन ज्ञानाचा यज्ञ करून ज्ञान-यज्ञ पुं.तृ.ए.व.

यजन्तः यज्ञ करून यज् धातू यज्ञ करणे शतृ प्रत्यय पुं. प्र. ब. व.

एकत्वेन एकतत्वाने एकत्व नपुं. तृ. ए. व.

पृथक्त्वेन विश्लेषण करून पृथक्त्व नपुं. तृ. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

च सुद्धा अव्यय

विश्वो मुखम् विश्वव्यापी असे मानून विश्वस्वरूप विश्वतः मुख पुं. द्वि. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

बहुधा विविध अव्यय

उपासते उपासना करतात उप+आस् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

7व्या अध्यायातील 16 व्या श्लोकात चार प्रकार च्या भक्तांचे सविस्तर वर्णन दिले आहे. आपल्या समाजात सर्वच व्यक्ति काही महात्मा असू शकत नाहीत म्हणजे ते श्रीकृष्ण भक्त नाहीत असे काही नाही. त्यांचेच वर्णन ह्या श्लोकात सांगितले आहे.

ह्या इतर प्रकारच्या भक्तांच्या उपासनांच्या वेगवेगळ्या तीन पद्धती सांगितल्या आहेत. पहिला प्रकारचे वर्णन म्हणजे एकतत्व जे आदि शंकराचार्यजींच्या आत्म षटकम् प्रमाणे आहे. मी कोण? अशी स्वतःची ओळख करून देत असताना मी कोण नाही हे सांगता सांगता मी फक्त निर्विकल्प, निराकार, सर्वत्र व्याप्त असा सत् चित् आनंद स्वरूप आहे.

ज्ञानयोगाचा उल्लेख ह्या श्लोकात केला आहे. 'ब्रह्म सत्य जगत मिथ्या' जीवच ब्रह्म आहे, हे असे ज्ञान. तत्त्वम् असि ' असे विचार, 'सो हम् ' असा अनुभव ही सर्व ज्ञानयोगाची लक्षणे आहेत. ह्या प्रकारातील लोक अद्वैतवाद मानणारे. श्रीमद्भगवद्गीतेच्या 18 व्या अध्यायातील 70 व्या श्लोकात गीतेचे अध्ययन हाच ज्ञानयोग असे म्हटले आहे.

दुसर्या प्रकारचे लोक आहेत जे निरनिराळ्या देवतांची उपासना करतात. जसे बुद्धि ची देवता श्रीगणेश, शक्ति ची देवता श्रीहनुमान, संपत्ति ची देवता श्रीलक्ष्मी वगैरे.

तिसऱ्या प्रकारचे लोक संपूर्ण विश्वामधे श्रीभगवानांचे रुप बघतात. विविधतेत एकता असे आपण भारताचे वर्णन करतो. तसेच पृथकत्वात एकत्व असा विचार येथे सांगितला आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

काही जण ज्ञानमार्गाने यज्ञ करून, काही अद्वैत भावने काही द्वैत भावाने तर इतर मला विश्वव्यापी असे समजून विविध प्रकारे माझी उपासना करतात.

---

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाऽहमहमौषधम्। मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम्।।9.16।।**

अहम् क्रतुः, अहम् यज्ञः, अहम् स्वधा, अहम् औषधम्, अहम् मन्त्रः, अहम् आज्यम्, अहम् अग्निः, अहम् एव हुतम्

अहम् मी अस्मद् प्र. ए. व. क्रतुः  वैदिक संकल्प क्रतु पुं. प्र. ए. व.

अहम् यज्ञः, मी यज्ञ

यज्ञ पुं. प्र. ए. व.

अहम् स्वधा, मी नैवेद्य स्वधा स्त्री. प्र. ए. व.

अहम् औषधम्, मी औषधी औषध नपुं. प्र. ए. व.

अहम् मन्त्रः,मी मन्त्र

मन्त्र पुं. प्र. ए. व.

अहम् आज्यम्, मी हवि

आज्य नपुं. प्र. ए. व.

अहम् अग्निः, मी अग्नि

अग्नि पुं. प्र. ए. व.

अहम् एव हुतम् मीच आहुती

एव नक्की अव्यय

हु धातु क्त प्रत्यय पुं. प्र. ए. व.

आता ह्या पुढील 4 श्लोकात श्रीभगवानकृष्णांच्या विश्वरूपाचे वर्णन वाचायला मिळणार आहे. सार्वभौमिकता अनुभव आपल्याला पुढील श्लोकात मिळणार आहे.

आधीच्या अध्यायात आपण यज्ञ ह्या संकल्पनेवर विस्तृत चर्चा केली आहे. यज्ञ कर्मकांड हे केवळ फक्त प्रतिकात्मक असून त्यामागे एखाद्या चांगल्या गोष्टीची सुरवात आणि तो संकल्प तडीस नेणे असा विचार आहे. म्हणून अन्न हे पूर्णब्रह्म कारण त्यामागे जीवसृष्टीचा विकास हा विचार आहे.

ह्या श्लोकातील क्रतु आणि यज्ञ हे दोन शब्द मला महत्वाचे वाटते ते अशा अर्थाने कि क्रतु चा अर्थ आपण वैदिक संकल्प असा घेतला तर पौराणिक पद्धतीने केलेल्या यज्ञ चा अर्थ स्मार्त संप्रदायाशी निगडित. स्मार्त म्हणजे जे श्रुतींवर विश्वास ठेवतात. शंकराचार्यांनी गीता, महाभारत, विष्णुसहस्त्रनाम ह्या सर्वांना स्मृती च म्हटले आहे. मंत्र ह्या शब्दाचा अर्थ उपदेश. राजाला सल्ला देणारे मंत्री. शब्दांचे मंत्र करण्याचे सामर्थ्य ज्याच्या कडे तो महान ज्ञानी असतो जो परमेश्वराला आव्हान करू शकतो.

अग्नी ची महती वेगळी सांगायला नको. यज्ञात अर्पण करण्यात येणाऱ्या हवि आणि आहुतींचा उल्लेख येथे केला आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

वेद आणि स्मृती स्मृतींमधे सांगितलेली यज्ञकर्म, त्यासाठी लागणारी आहुती, औषधी वनस्पती, नैवेद्य, इतर सामुग्री अग्नी आणि यज्ञाच्या वेळी केले जाणारे मंत्रोच्चार पण मीच आहे.

---

**पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः। वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च।।9.17।।**

अहम् एव अस्य जगतः पिता, माता, धाता, पितामहः, वेद्यम्, पवित्रम्, ओङ्कारः, ऋक्, साम, यजुः च।

अहम् एव   मी च

अस्मद् प्र. ए. व.

एव अव्यय

अस्य ह्या इदम् नपुं. ष. ए. व.

जगतः जगाचा जगत् नपुं. ष. ए. व.

पिता, पितृ पुं. प्र. ए. व.

माता मातृ स्त्री. प्र. ए. व.

धाता, धारण करणारा धातृ पुं. प्र. ए. व.

धा धातू धारण करणे

पितामहः आजोबा पितामह पुं. प्र. ए. व.

वेद्यम् ज्ञानाचे लक्ष्य, जाणून घेण्यायोग्य विद् धातु ण्यत् प्रत्यय नपुं. द्वि. ए. व.

पवित्रम् पवित्र नपुं. प्र. ए. व.

ओङ्कारः ओंकार पुं. प्र. ए. व.

ऋक्, ऋग्वेद ऋच् स्त्री. प्र. ए. व.

साम, सामवेद सामन् नपुं. प्र. ए. व.

यजुः यजुर्वेद यजुस् नपुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

ह्या श्लोकात ॐ काराचा उल्लेख केला आहे. ॐकाराला वेदांचे सार असे म्हणतात आणी मोक्षप्राप्ती चे साधन.

उपनिषदांमध्ये वेदांना अपरा विद्या म्हटले आहे. पा धातु म्हणजे पालनपोषण करणे त्यापासून निर्माण झालेला शब्द पिता, मा धातु म्हणजे मोजणी करणे, त्या पासून तयार झालेला शब्द माता, जी जीवाला मूर्त स्वरूप देते.

स्वतः बद्दल पुढे सांगताना श्रीभगवान कृष्ण असे म्हणतात की

मीच पिता, माता, पितामह, ह्या जगाला धारण करणारा, ज्ञानाचे लक्ष्य असणारा, पवित्र ओंकार, ऋग्वेद सामवेद आणि यजुर्वेद आहे.

---

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्। प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्।।9.18।।**

गतिः, भर्ता , प्रभुः, साक्षीः, निवासः, शरणम्, सुहृतः, प्रभवः, प्रलयः, अव्ययम्, बीजम्, स्थानम्, निधानम् च अहम् एव।

गतिः गंतव्य स्थान गति स्त्री. प्र. ए. व.

भर्ता भरणपोषण करणारा भर्तृ पुं. प्र. ए. व.

प्रभुः स्वामी प्रभु पुं. प्र. ए. व.

साक्षीः नियंत्रक साक्षिन् पुं. प्र. ए. व.

निवासः निवास पुं. प्र. ए. व.

शरणम् आश्रय दाता शरण पुं. प्र. ए. व.

सुहृतः सहृदयी सुहृद पुं. प्र. ए. व.

प्रभवः उत्पत्ती स्थान प्रभव पुं. प्र. ए. व.

प्रलयः प्रलय पुं. प्र. ए. व.

अव्ययम् अविनाशी अव्यय पुं. प्र. ए. व.

बीजम् बीज नपुं. प्र. ए. व.

स्थानम् स्थिरता स्थान नपुं. प्र. ए. व.

निधानम् संग्रह निधान नपुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

एव नक्की अव्यय

प्रत्येकाच्या आयुष्यात असतात प्रेरणा आणि त्यांना साध्य करायची असणारी ध्येय. अंतिम ध्येय मात्र कृष्ण. म्हणून श्रीभगवानकृष्ण असे सांगत आहेत की

मीच ते गंतव्यस्थान,

गति ह्याचा अर्थ कर्मफळ असे सुद्धा म्हटले आहे. श्रीभगवानकृष्णांनी स्वतः ला भर्ता म्हणजे सृष्टीचा पालनकर्ता असे म्हटले आहे. त्यानंतर श्रीभगवानकृष्ण म्हणतात मीच ह्या जगाचा स्वामी, सर्वांना जाणणारा साक्षीदार, माझ्यापासूनच सर्वांची उत्पत्ती, माझ्यातच निवास आणि माझ्यातच विलीनीकरण, मीच आश्रयदाता मीच हितचिंतक. आणि इतके सर्व सांगून झाल्यावर ते पुढे म्हणतात मी उत्पत्ती करणारे बीज. ह्या पुढील शब्द अव्यय आणि निधान काय सुचवायचे असेल बरे. ते जीवाष्म बद्दल तर बोलत नसतील? अव्यय म्हणजे कधीही नष्ट न होणारे. जीवाष्म्या च्या रुपात करोडो वर्षी पूर्वी चे जीव आणि बीज अस्तित्व टिकवून आहेत. ज्याचा अभ्यास करून आपल्या व्युत्पत्ती ची साखळी जोडता येते. धा धातु पासून तयार झालेला शब्द निधान म्हणजे खजिना सुद्धा मीच. खजिन्याचा उपयोग अडीअडचणीला केला जातो. कर्मफळांचा संग्रह सुद्धा असाच उपयोगी पडत असावा. माणसे येतात जातात. पण परमेश्वराचे अस्तित्व मात्र चिरंतन आहे.

---

**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च। अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन।।9.19।।**

हे अर्जुन! अहम् तपामि, वर्षम्, निगृह्णामि उत्सृजामि च, अहम् अमृतम् मृत्युः च, सत् च असत् च अहं एव ।

हे अर्जुन!

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

तपामि तापतो तप् धातू तप्त होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

वर्षम् पाऊस वर्ष पुं. द्वि. ए. व.

निगृह्णामि शोषून घेतो

नि+ग्रह धातू स्वीकार करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

उत्सृजामि सोडून देतो उत् +सृज् धातू सोडून देणे कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

च सुद्धा अव्यय

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

अमृतम् अमृत नपुं. प्र. ए. व.

मृत्युः मृत्यु पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

सत् सत नपुं. प्र. ए. व. अस् धातू असणे

च

असत् नसणे असत् नपुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अहम् एव मीच

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

एव अव्यय

सूर्य आहे म्हणून ह्या पृथ्वीवर जीवन आहे हे शास्त्रीय सत्य ह्या श्लोकात सांगितले आहे. जन्ममृत्यूचे चक्र चालू ठेवणारे पण तेच आहेत.

सातव्या अध्यायातील 8,9,10 श्लोकात श्रीभगवानांनी त्यांचे परमेश्वरी अस्तित्व विषद करून सांगितले होते. त्या 3 श्लोकांना जोडून हा श्लोक वाचता येईल.

अहमेवासमेवाग्रे नान्यद् यत् सदसत् परम्।पश्चादहं यदेच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम्।।

श्रीमद्भागवतम्-2.9.32)

येथे श्रीभगवानकृष्ण ब्रह्मा ला सांगतात. मीच सृष्टी निर्माण केली त्या आधी मीच होतो. सृष्टीचा विनाश झाल्यावरही मीच असेन.

सूर्यप्रकाशाचे आपल्या आरोग्याला होणारे फायदे आपल्याला माहीत आहेतच, शिवाय वनस्पती सुद्धा आपले अन्न तयार करतात सूर्यकिरणांमुळे. सूर्याच्या उष्णतेने पाण्याची वाफ होते आणि आपल्याला ऊब सुद्धा मिळते. तिसऱ्या अध्यायातील 14 व्या श्लोकात पर्जन्य चक्राचा उल्लेख आढळतो. थोडक्यात आपले आयुष्यच सूर्यप्रकाशावर अवलंबून आहे.

कधी अतीवृष्टी आणि कधी दुष्काळ हे घडवून आणणारे सुद्धा तेच आहेत असे म्हटले तर त्यामागचे कारण काय असावे? त्याला सुधारणात्मक कार्यवाही असे म्हणता येईल का? सूर्यकिरणांतील अल्ट्रा व्हायोलेट किरणांचा सूक्ष्म पातळीवर स्वच्छता राखण्यासाठी फायदा होतोच. पारंपरिक पद्धतीने धान्याला उन दाखवण्याची पद्धत आहेच.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे अर्जुना! मी सूर्यातील ऊष्णता आहे. मीच पाणी शोषून घेतो (वाफ करतो) आणि पाऊस पाडतो. मीच अमृत आणि मीच मृत्यू. मीच अस्तित्व आहे आणि मीच अस्तित्वहीन आहे.

---

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते। ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोक**

**मश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान्।।9.20।।**

त्रै-विद्याः सोमपाः पूत-पापाः माम् यज्ञैः इष्ट्वा स्वर्गतिम् प्रार्थयन्ते । ते पुण्यम् सुरेन्द्र-लोकम् आसाद्य, दिवि दिव्यान् देव-भोगान् अश्नन्ति।

त्रै-विद्याः तिन्ही वेद जाणणारा त्रै-विद्य पुं. प्र. ब. व.

सोमपाः सोमरस पिणारा सोमपा पुं. प्र. ब. व.

पा धातू पिणे

पूत-पापाः पाप रहीत पूत पाप पुं. प्र. ब. व.

पू धातू पवित्र करणे

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

यज्ञैः यज्ञांद्वारे यज्ञ पुं. तृ. ब. व.

इष्ट्वा पूजून इष् धातू इच्छा करणे क्त्वा प्रत्यय

स्वर गतिम् स्वर्ग प्राप्ती स्वरगति स्त्री. द्वि. ए. व.

स्वर् आनंदी अवस्था

प्रार्थयन्ते प्र +अर्थ धातू मागणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

ते ते तद् पुं. प्र. ब. व.

पुण्यम् पवित्र पुण्य पुं. द्वि. ए. व.

सुरेन्द्र-लोकम् इन्द्र लोक सुरेन्द्र-लोक पुं. द्वि. ए. व.

आसाद्य, उन्नति आङः+सद् धातू चढणे ल्यप प्रत्यय

दिवि दिव स्त्री. स. ए. व.

दिव्यान् दिव्य पुं. द्वि. ब. व. दिव् धातू चमकणे

देव-भोगान् देवभोग पुं. द्वि. ब. व.

भुज् धातू उपभोग घेणे

अश्नन्ति उपभोग घेतात अश् धातू खाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

ह्या अध्यायातील 11 आणि 12 व्या श्लोकात मंदबुद्धी व्यक्ती, राक्षसी आसुरी शक्तिंच्या प्रभावाखाली असणार्या व्यक्तिंबददल सांगितले. त्यानंतर ईश्वराला शरण गेलेले महात्मा आणि इतर भक्तांच्या उपासनेच्या तीन वेगवेगळ्या पद्धती सांगितल्या. त्यानंतर आता त्रै- विद्या म्हणजे तीन वेद जाणणाऱ्या व्यक्तिंबददल विवेचन केले आहे.

आपल्याला द्विवेदी त्रिवेदी चतुर्वेदी अशी नावे माहित आहेत.

दुसरा उल्लेख आहे सोमरसाचा. सोम वनस्पतीपासून तयार केलेला रस. आज सोम वनस्पती नक्की कोणती हे माहीत नसले तरी सोमलता किंवा सोमवल्ली नावाच्या वनस्पती उपलब्ध आहेत ज्यांचे गुणधर्म सुश्रुतसंहितेत सांगितलेल्या सोम वनस्पतीशी मिळतेजुळते आहेत. सुश्रुतसंहितेनुसार जी व्यक्ती सोम वनस्पतीपासून बनविलेल्या रसाचे प्राशन करते त्याला नवीन तरुण शरीर प्राप्त होते. त्याला अग्नी, जल,

विष किंवा आयुधाद्वारे हानी पोहोचत नाही. कुठल्याही अवघड अडचणीच्या जागेवर तो चालू शकतो आणि कंदर्पचे सौंदर्य व पौर्णिमेच्या चंद्रासारखी चमक त्याला प्राप्त होते. सर्व वेद त्यांच्या शाखांसह त्या व्यक्तीस मुखोद्गत होतात. सोम पिणाऱ्या व्यक्तीस आयुष्यात कधीही अपयश येत नाही व तो सर्वत्र दैवी आत्म्यासह हिंडतो. तो सर्व जीवमात्रांच्या मनाला शांती देतो. अशा अर्थाचे उल्लेख त्यात आहेत.

आता ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की जे तीन वेद जाणतात, वैदिक कर्मकांड करतात, सोमरस प्राशन करतात, पापरहित होतात, यज्ञ करून मला स्वर्ग प्राप्तिसाठी साकडे घालतात ते पुरूष आपापल्या पुण्यकर्मानुसार स्वर्ग प्राप्ती करून दिव्य अशा देवभोगाचा उपभोग घेतात.

---

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।एव त्रयीधर्ममनुप्रपन्ना**

**गतागतं कामकामा लभन्ते।।9.21।।**

ते तम् विशालम् स्वर्ग-लोकम् भुक्त्वा, पुण्ये क्षीणे मर्त्य-लोकम् विशन्ति। एवम् त्रयी-धर्मम् अनुप्रपन्नाः काम-कामाः गत-आगतम् लभन्ते।

ते तो तद् पुं. प्र. ब. व.

तम् त्याचे पुं. द्वि. ए. व.

विशालम् विशाल पुं. द्वि. ए. व.

स्वर्ग-लोकम् स्वर्ग लोक पुं. द्वि. ए. व.

भुक्त्वा, भोगून झाल्यावर

भुज धातू उपभोग घेणे क्त्वा प्रत्यय

पुण्ये पुण्य नपुं. स. ए. व.

क्षीणे कमी होणे क्षी धातु क्त प्रत्यय नपुं. स. ए. व.

मर्त्य-लोकम् मृत्यू लोक मर्त्य-लोक पुं. द्वि. ए. व.

विशन्ति प्राप्त करतात

विश् धातू प्रवेश करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

एवम् अशाप्रकारे अव्यय

त्रयी-धर्मम् धार्मिक सत्प्रवृत्ती त्रयी-धर्म पुं. द्वि. ए. व.

अनुप्रपन्नाः होत राहतात

अनुप्रपन्न पु. प्र. ब. व.

अनु +प्र +पद् धातू जाणे

काम-कामाः इच्छाआकांक्षा

काम-काम पु. प्र. ब. व.

गत-आगतम् जाणेयेणे गत आगत पु. द्वि. ए. व.

लभन्ते मिळतात

लभ् धातू लाभ होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

आपल्या सर्वांनाच स्वर्ग प्राप्ती बद्दल कुतुहल आहे. पाप आणि पुण्याच्या आपल्या कल्पना स्वर्ग आणि नरक ह्याच्याशी जोडलेल्या असतात. वेगवेगळ्या श्लोकात ह्या बद्दल विवेचन सापडते..

तावत् प्रमोदते स्वर्गे यावत् पुण्यं समाप्यते।

क्षीणपुण्यः पतत्यगिनिच्छन् कालचालितः।।

श्रीमद्भागवतम्-11.10.26

पुण्यकर्म समाप्त होइपर्यंत लोक स्वर्गसुखाचा उपभोग घेत असतात. त्यानंतर मात्र त्यांना परत पाठवले जाते.

अनुप्रपन्न ह्या शब्दाचे दोन अर्थ सापडतात. 1.गुरूवाक्य आणि त्रिविद्येचा आश्रय घेऊन सकाम अनुष्ठानाला शरण गेलेले. 2. स्वर्गलोकाहून परत भूतलावर येऊन त्रिविद्येचा आश्रय घेऊन स्वर्ग प्राप्ती ची इच्छा करणारे.

त्यांचे वर्णन कामकामा असे केले आहे.

अशी कामना ठेवून भक्ती करणाऱ्यांचे सार्थ वर्णन आदी शंकराचार्यांनी केले आहे.

"पुनरपि जननं पुनरपि मरणं, पुनरपि जननी जठरे शयनम्। इह संसारे बहुदुस्तारे, कृपयाऽपारे पाहि मुरारे॥" भजगोविंदम्। 21।।

ह्या जगात पुन्हा पुन्हा जन्म आणि मरण असे होत राहते. आईच्या उदरात पुन्हा पुन्हा रहावे लागते. हे मुरारी मला ह्या चक्राच्या पलिकडे घेऊन चल.

मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति || कठोपनिषद् 2.1.10।।

जो व्यक्ति इहलोक आणि परलोक वेगवेगळे समजतो तो मृत्यू ने मृत्यू ला प्राप्त होतो.

मागील श्लोकात वेद

जाणणारे लोक स्वर्गात जाऊन पोहोचतात असे आपण वाचले, त्यापुढे काय घडते त्या बद्दल श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की आपापल्या पुण्यसंचितानुसार स्वर्गसुखाचा आनंद उपभोगून झाल्यावर ते परत या भूतलावर परत येतात. अशाप्रकारे स्वर्गप्राप्ती साठी जे तीनही वेदांत सांगितलेल्या उक्तीचे अवलंबन करतात आणि परत परत ह्या जगात येत जात राहतात.

---

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्।।9.22।।**

ये जनाः अनन्याः माम् चिन्तयन्तः पर्युपासते, तेषाम् नित्य-अभियुक्तानाम् योग-क्षेमम् अहम् वहामि।

ये जे यद् पुं. प्र. ब. व.

जनाः लोक जन पुं. प्र. ब. व.

अनन्याः (ज्यांच्या साठी) इतर काहीही नाही ते

न अन्याः अन्य पुं. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

चिन्तयन्तः विचार करून चिन्तयत् पुं. प्र. ब. व.

चिन्त धातू चिंतन करणे, स्मरण करणे

पर्युपासते, जवळ जाणे (परमेश्वराच्या)

परि +उप +आस् धातू बसणे कर्तरि प्रयोगः लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ब. व.

तेषाम् त्यांचे तद् पुं. ष. ब. व.

नित्य-अभियुक्तानाम् कायम योगाशी जोडला गेलेला

नित्य-अभियुक्त पुं. ष. ब. व.

नित्य +अभि +युज् धातू जोडणे

योग-क्षेमम् समतोल कल्याण योग-क्षेम नपुं. द्वि. ए. व.

योगं च क्षेमं च क्षि धातू टिकून राहणे

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

वहामि वाहतो वह् धातू चालू राहणे, वाहणे कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

हा श्लोक संपूर्ण गीता समजून घेतल्यानंतर वाचावा असा आहे. म्हणजे गीतेमध्ये तीन योग सांगितले आहेत जसे ज्ञानयोग कर्मयोग आणि भक्तीयोग. भक्तीचे अनेक प्रकार सांगितले असले तरी कुठेही कर्मकांडांचे स्तोम माजवलेले नाही. सर्वांप्रती समत्व आणि अहंकारशून्यता सांगितली आहे. योग ह्या शब्दाचा अर्थच ज्या गोष्टी खऱ्या भक्ताकडे नाहीत त्या जोडून घ्यायच्या आणि क्षेम म्हणजे जे गुण आहेत त्याचे संरक्षण करायचे.

योग म्हणजे अध्यात्मिक शक्ति. क्षेम म्हणजे परमानंदाची प्राप्ती. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण त्यांच्या भक्तांवर कशी कृपा करतात ते उघडपणे सांगत आहेत. अतिशय समतोल शब्दाचा वापर केलेला आहे ह्या श्लोकात. संपूर्ण गीतेत परमेश्वराची कृपादृष्टी होणे म्हणजे धनदौलत संपत्ती सत्ता यांची प्राप्ती असे म्हटलेले नाही.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी असे म्हटले आहे की

जे लोक फक्त माझेच चिंतन करतात, फक्त माझीच भक्ती करतात अशा लोकांना मी परमात्म्याला जोडून घेण्यासाठी मदत करतो आणि त्यांचा सांभाळही करतो.

---

**येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयाऽन्विताः। तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्।।9.23।।**

हे कौन्तेय! ये अन्य-देवता-भक्ताः अपि यजन्ते श्रद्धया अन्विताः, ते अपि माम् एव अविधि-पूर्वकम् यजन्ति।

हे कौन्तेय!

ये जे यद् पुं. प्र. ब. व.

अन्य इतर अव्यय

देवता-भक्ताः देवतांचे भक्त देवता-भक्त पुं. प्र. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

यजन्ते पूजतात यज् धातू म्हणजे यज्ञ करणे, पूजणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

श्रद्धया श्रद्धापूर्वक श्रद्धा स्त्री. तृ. ए. व.

अन्विताः संबंधित अनु+इ धातु जाणे + क्त प्रत्यय पुं. प्र. ब. व.

ते ते तद् पुं. प्र. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

माम् अस्मद् द्वि. ए. व.

एव नक्की अव्यय

अविधिपूर्वकम् अयोग्य पद्धतीने अ +विधिपूर्वक पुं. द्वि. ए. व.

यजन्ति पूजतात यज् धातू म्हणजे यज्ञ करणे, पूजणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

आधीच्या श्लोकाचा संदर्भ घेऊन हा श्लोक वाचला तर श्रीभगवानकृष्णांना काय म्हणायचे आहे ते नीट लक्षात येइल.

आपल्या संस्कृतीत नवस बोलणे हा एक लोकप्रिय विधी असतो. अमुक एका देवतेला नवस बोलल्यास इच्छित फळ मिळते अशी समजूत असते. तसेच

बुद्धि ची देवता सरस्वती, धनाची देवता लक्ष्मी, शक्ति चे प्रतिक श्रीहनुमान असे सुद्धा आपण मानतो व त्याप्रमाणे त्या त्या देवतेची उपासना केली जाते. असे करण्यात आपल्याला त्या उपासनेपासून लाभ मिळावा अशी अपेक्षा असते.

भक्ती ही कोणत्याही लाभाची अपेक्षा न करता करावी हे आधी स्पष्ट पणे सांगून झाले आहे. परमेश्वराचे मनोभावे चिंतन करणे, परमेश्वराला शरण जाणे हेच अपेक्षित आहे.

श्रीभगवानकृष्ण येथे असे म्हणतात की जे इतर देवतांची पूर्ण श्रद्धेने उपासना करतात ते अप्रत्यक्षपणे माझीच उपासना करत असतात पण त्यांची पद्धत चुकीची असते. म्हणजे येथे पूजा अर्चा करण्याची पद्धत चुकीची आहे असे म्हणायचे नसून परमेश्वराची ओळख पटवून घेण्यात चूक होते आहे असे म्हणायचे आहे. पाने, फांद्या हे सर्व वृक्षाचेच भाग आहेत पण पाणी मात्र वृक्षाच्या मुळाशी घालायला हवे. फांदीला आणि पानांना पाणी देत असाल तर काय उपयोग? सर्व काही मीच आहे असे श्रीभगवानकृष्ण सांगत आहेत. निरनिराळ्या पंथाची उपासना करणाऱ्या भक्तांनी हा श्लोक विशेष लक्ष देऊन वाचायला हवा.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे कौन्तेय! जे भक्त श्रद्धापूर्वक इतर देवतांचे पूजन करत असतात ते खरे तर मलाच पूजत असतात पण अज्ञानाने.

---

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च। न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते।।9.24।।**

अहम् एव हि सर्व-यज्ञानाम् भोक्ता च प्रभुः च, ते तु माम् तत्त्वेन न अभिजानन्ति, अतः च्यवन्ति।

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

एव सुद्धा अव्यय

हि कारण अव्यय

सर्व-यज्ञानाम् सर्व यज्ञाचा सर्व-यज्ञ पुं. ष. ब. व.

भोक्ता भोगणार भुज् धातु तृच् प्रत्यय पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

प्रभुः च प्रभू सुद्धा प्रभु पुं. प्र. ए. व.

ते ते तद् पुं. प्र. ब. व.

तु परन्तु अव्यय

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

तत्त्वेन तत्त्वानुसार तत्व नपुं. तृ. ए. व.

न अभिजानन्ति, समजून घेत नाही अभि +ज्ञा

ज्ञा धातू जाणणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

अतः म्हणून अव्यय

च्यवन्ति ऱ्हास होतो

च्युङ् धातू पडणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

आधीच्या दोन श्लोकाचा अर्थ मनात ठेऊन हा श्लोक वाचला कि अर्थ लगेचच समजतो. च्यवन्ति म्हणजे पडतात. च्युत म्हणजे पाय उतार होणे. म्हणजे इथे ह्याचा अर्थ पुन्हा मायावी जगात अडकणे.

यज्ञ म्हणजे कर्मकांड नव्हे. यज्ञाचा अर्थ आहे विष्णू.

अच्युत हे श्रीविष्णूंचे विशेषण आहे. यज्ञ ह्या शब्दाचा व्यापक अर्थ आपण आधीच समजून घेतला आहे.

"उदर भरण नोहे जाणिजे यज्ञकर्म"

'यज्ञाद भवति पर्जन्यो'.

'आतां विश्वात्मके देवे, येणे वाग्यज्ञे तोषावे' ह्या सर्वांचे अर्थ आपल्याला माहीत आहेत.

तिसऱ्या अध्यायात यज्ञकर्माचे महत्त्व विशद केले आहे.

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः ब्रह्माग्नौ ब्राह्मण हुतम्।

ब्रह्मैव तेन उद्देश्यं ब्रह्मकर्म समाधिना।। 4.24।।

यज्ञात अर्पण करण्याच्या गोष्टी ब्रह्म आहे. जो आहुति देतो तो सुद्धा ब्रह्म आहे, आहुति दिला जाणारा अग्नी सुद्धा ब्रह्म, आणि जो आहुति देतो तो सुद्धा ब्रह्मच. जो व्यक्ति ब्रह्मा मध्ये स्थित असतो तो ब्रह्माला प्राप्त करतो.

मी सकाळां यज्ञांचा आदि। आनि यज्ञ या मिची अवधि।

किं मातें चुकोनि दुर्बुद्धि। देवन भजले॥ ज्ञानेश्वरी 9.352 ॥

मीच यज्ञांचा आरंभ आणि शेवट. पण दुर्बुद्धी असणारे देवतांना भजतात.

सर्वाजीवे सर्वसंस्थे बृहन्ते अस्मिन्हंसो भ्राम्यते ब्रह्मचक्रे। पृथगात्मानं प्रेरितारं च मत्वा जुष्टस्ततस्तेनामृतत्वमेति॥ श्वेताश्वतर-उपनिषद। 6.12।।

असंख्य जीवांवर अधिराज्य करणारा परमेश्वर एका बीजापासून विभिन्न रूपे निर्माण करतो. त्या स्वरूपाची पूजा करणे म्हणजे शाश्वत सुखाची प्राप्ती.

आता ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की मी समस्त यज्ञाचा भोक्ता आहे, प्रभू सुद्धा मीच आहे. म्हणून जे लोक माझे हे दिव्य स्वरूप जाणून घेत नाहीत त्यांचा ऱ्हास होतो.

---

**यान्ति देवव्रता देवान् पितॄन्यान्ति पितृव्रताः। भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम्।।9.25।।**

देव-व्रताः देवान् यान्ति, पितृ-व्रताः पितॄन् यान्ति, भूत-इज्याः भूतानि यान्ति, मत् याजिनः अपि माम् यान्ति।

देव-व्रताः धार्मिक कार्य

देवव्रत पुं. प्र. ब. व.

देवान् देव पुं. द्वि. ब. व.

यान्ति प्राप्त होतात या धातू जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

पितृ-व्रताः पितरांसाठी केलेले व्रत पितृ-व्रत पुं. प्र. ब. व.

पितॄन् पितरांना पितृ पुं. द्वि. ब. व.

यान्ति प्राप्त होतात या धातू जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

भूत-इज्याः व्यक्ती पूजन, मंत्र तंत्र

भूत इज्य पुं. प्र. ब. व.

यज् इज्यते यज्ञ करणे, पूजा करणे

भूतानि भूते भूत नपुं. द्वि. ब. व.

यान्ति प्राप्त होतात या धातू जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

मत् याजिनः मला पूजणारे अस्मद् याजिन् पुं. प्र. ब. व.

याजिन् पूजा करणे

अपि सुद्धा अव्यय

माम् अस्मद् द्वि. ए. व.

यान्ति प्राप्त होतात या धातू जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

ह्या श्लोका मध्ये आपापल्या प्रवृत्ती, आवडीनिवडी नुसार लोक ज्यांची उपासना करतात, त्यांचे वर्णन केले आहे. व्यक्ति म्हणजेच प्रवृत्ती. आपल्या समाजात सर्वच जण सात्विक वृत्ती चे असतिल अशी अपेक्षा इथे दर्शविलेली नाही. तर सर्व प्रकारच्या स्वभावाचे, निरनिराळ्या वृत्ती चे लोक ज्यांना आपापल्या इच्छेनुसार भक्तीचा समान हक्क आहे. आणि त्यांच्या इच्छा सुद्धा तशाच पूर्ण होतील असे म्हटले आहे.

'तं यथा यथोपासते तदेव भवति'

जो जसा उपासना करतो तसा तो होतो, असे श्रुतींमधे म्हटले आहे. जसे आपण परिश्रम घेऊ तसेच त्याचे फळ मिळणार. तंत्र मंत्र अघोरी विद्या यांचा उल्लेख करून त्या नुसार त्याची फळे मिळतात हे स्पष्ट करून सांगताना, त्यापलीकडे जाऊन शुद्ध निर्मळ भक्ती चे महत्व सुद्धा सांगितले आहे.

"श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः"। 17.3।।

प्रत्येक व्यक्ति आपापल्या श्रद्धेनुसार उपासना करतो.

संत ज्ञानेश्वरांनी म्हणून ठेवले आहेच, 'जो जे वांछील तो ते लाभो'.

अशाच अर्थाचा हा श्लोक

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जे ईष्टदेवतांना पूजतात ते देवतांना प्राप्त होतात. जे आपल्या पितरांना पूजतात ते पितरांकडे जातात. जे भूत-प्रेत, काळी शक्तिंचे पूजन करतात त्यांना ते प्राप्त होते. पण जे मला पूजतात ते मला प्राप्त होतात.

---

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति। तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः।।9.26।।**

यः मे भक्त्या पत्रम् पुष्पम् फलम् तोयम् प्रयच्छति, प्रयत-आत्मनः भक्ति-उपहृतम् तत् अहम् अश्नामि।

यः जो यद् पुं. प्र. ए. व.

मे मला अस्मद् च. ए. व.

भक्त्या भक्तिभावाने भक्ति स्त्री. तृ. ए. व.

पत्रम् पाने नपुं. द्वि . ए. व.

पुष्पम् फुले पुष्प नपुं. द्वि . ए. व.

फलम् फळे फल नपुं. द्वि . ए. व.

तोयम् पाणी तोय नपुं. द्वि. ए. व.

प्रयच्छति, देतो

प्र +यम् धातू अर्पण करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

प्रयत-आत्मनः विशुद्ध आत्मा प्रयत-आत्मन् पुं. ष. ए. व.

भक्ति-उपहृतम्

उप +हृ हरति भेट देणे क्त प्रत्यय नपुं. द्वि. ए. व.

तत् ते नपुं. प्र. ए. व.

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

अश्नामि खातो स्वीकारतो

अश् धातू खाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

आपल्याला शबरीची उष्ट्या बोरांची गोष्ट माहीत आहेच. शिवाय विदुराच्या पत्नीने अनावधानाने कृष्णाला दिलेल्या केळ्याच्या सालीची सुद्धा गोष्ट माहीत आहे. सुदामा चे पोहे श्रीभगवानकृष्णांनी अतीव प्रेमाने चाखले होते. आधुनिक काळात पर्यावरणाच्या संरक्षणाच्या दृष्टीने एक मुद्दा सांगावासा वाटतो. सर्व सृष्टी परमेश्वराने निर्माण केली असल्याने, त्यानेच निर्माण केलेल्या फुले आणि फळांमधे त्याच्या मनात दुजाभाव असण्याचे कारण नाही. आपण मात्र व्यापारीकरणाच्या नादात काही विशिष्ट धान्य, फळे यांना विशेष महत्त्व देतो. जसे हापूस आंबा सर्वश्रेष्ठ आणि म्हणून सर्वात महाग सुद्धा. सर्व शेतकरी सुद्धा मग लोकप्रिय वाणांचीच लागवड जास्त करतात. पर्यायाने निसर्गाचा समतोल बिघडतो.आंब्याच्या सर्व जातींना समभाव द्यायला हवा. येथे श्रीभगवानकृष्ण स्वतः च सांगत आहेत की

परमेश्वराला साधीसुधी अगदी कोणतीही  गोष्ट दिलेली चालते. फक्त मनात सच्चा भाव असावा. बाह्य अवडंबर नको.

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया। शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा।।11.53।।

माझे चतुर्भुजरूप जे तू पाहिले आहेस ते वेदपठण, तप, दान किंवा यज्ञ करून पाहता येत नाही. (मनात भक्ती आणि प्रेम असायला हवे)

ह्या सर्वाचा लक्षणार्थ हाच की आपण काय अर्पण करतो ते महत्वाचे नाही तर त्यामागचे भाव शुद्ध असायला हवे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जो कोणी मला भक्तिभावाने पान फुल फळ पाणी अर्पण करतो. अशा शुद्ध मनाने भक्तीपूर्वक दिलेल्या उपहारांचा मी स्वीकार करतो.

---

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्।।9.27।।**

हे कौन्तेय! यत् करोषि, यत् अश्नासि, यत् जुहोषि, यत् ददासि, यत् तपस्यसि, तत् मत् अर्पणम् कुरुष्व।

हे कौन्तेय!

यत् जे (काही) यद् नपुं. द्वि. ए. व.

करोषि करतोस कृ धातु करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद म. पु. ए. व.

यत् जे यद् नपुं. द्वि. ए. व.

अश्नासि खातोस अश् धातु खाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद म. पु. ए. व.

यत् जे यद् नपुं. द्वि. ए. व.

जुहोषि यज्ञ करतोस

हु धातु देणे यज्ञ करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद म. पु. ए. व.

यत् यद् नपुं. द्वि. ए. व.

ददासि दान देतोस दा धातु देणे कर्तरि लट् लकार परस्मैपद म. पु. ए. व.

यत् जे यद् नपुं. द्वि. ए. व.

तपस्यसि तप करतोस

तपस् धातु तप्त होणे तपस्या करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद म. पु. ए. व.

तत् ते तद् नपुं. द्वि. ए. व.

मत् अर्पणम् मला अर्पण कर अस्मद्-अर्पण नपुं. प्र. ए. व.

कुरुष्व कर कृ धातु करणे कर्तरि लोट् लकारः आत्मनेपदी म. पु. ए. व.

25 व्या श्लोकात निरनिराळ्या लोकांच्या उपासना करण्याच्या पद्धती सांगून झाल्यावर श्रीभगवानकृष्ण सात्विक पद्धतीने उपासना करण्याचा सल्ला अर्जुनाला देत आहेत.

येथे अन्न खाणे असा फक्त शाब्दिक अर्थ न घेता कर्मफळांची उपभोग असा अर्थ लावता येईल. कर्म करणे म्हणजे फक्त व्यावहारिक कर्म असा अर्थ न घेता सामाजिक, वैदिक कर्म असा अर्थ घेतला तरी चालू शकेल. येथे यज्ञ, दान आणि तप ह्या सर्वांचा उल्लेख केला आहे.

17 व्या अध्यायातील 17 व्या श्लोकात फल इच्छारहित कायिक वाचिक मानसिक तपाला सात्विक तप असे म्हटले आहे.

नारदमुनींनी अतिशय चपखल असे भक्ताचे वर्णन केले आहे. सर्वात महत्त्वाचा विचार ह्या श्लोकात मांडलेला दिसतो तो असा की सर्व काही श्रीभगवानकृष्णांना अर्पण करायचे आहे म्हणजे त्याला अमुक एक मर्यादा सुद्धा नाही.

नारदस्तु तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ।। नारद भक्तिदर्शन, सूत्र-19

भक्तीचा अर्थ आपली सर्व कर्मे परमेश्वराला अर्पण करणे आणि एक क्षण जरी त्याचे विस्मरण झाले तरी अतिशय व्याकुळ होणे.

संत कबीर आपल्या दोह्या मध्ये असेच म्हणतात

जहँ जहँ चलुं करूँ परिक्रमा, जो जो करूँ सो सेवा।

जब सोवू करूँ दंडवत, जानें देव न दूजा।।

'श्रीकृष्ण समर्पण अस्तु' असे मन्त्रोच्चार आपण करतोच.

तसा हा श्लोक बारकाईने वाचला असता आपल्या रोजच्याच कर्मांचा उल्लेख येथे केला आहे. कुठेही घोर तपस्या कठोर उपवास असे शब्द वापरलेले नाहीत.

म्हणूनच ज्ञानेश्वर माऊली असे म्हणतात,

परि सर्वथा आपुले जीवीं । केलियाची से कांहींचि नुरवीं ।ऐसीं धुवोनि कर्मे द्यावीं । माझियां हातीं ॥ ज्ञानेश्वरी 401॥

आपल्या कर्तृत्वाचा अभिमान न बाळगता शुद्ध मनाने सर्व कर्मे मलाच अर्पण कर.

ह्या श्लोकाचा अर्थ  थोडक्यात असा की

हे कौन्तेय!

तू जे काही कार्य करशील

जे काही खाशील

जे काही यज्ञकर्म करशील

जे काही दानधर्म करशील

जी काही तपस्या करशील

ते सर्व मला अर्पण कर.

---

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः।संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि।।9.28।।**

एवम् संन्यास-योग-युक्त-आत्मा शुभ-अशुभ-फलैः कर्म-बन्धनैः मोक्ष्यसे विमुक्तः माम् उप-एष्यसि।

एवम् म्हणून, अशाप्रकारे अव्यय

संन्यास-योग-युक्त-आत्मा संपूर्ण समर्पित आत्मा

संन्यास-योग-युक्त-आत्मन् पुं. प्र. ए. व.

शुभ-अशुभ-फलैः सुभ अशुभ कर्मफळे

शुभ-अशुभ-फल नपुं. तृ. ब. व.

कर्म-बन्धनैः कर्माची बन्धने

कर्म-बन्धन नपुं. तृ. ब. व.

मोक्ष्यसे मुक्त होशील मुच् धातू मुक्त करणे, त्याग करणे कर्तरि लृट् लकार आत्मनेपदी म. पु. ए. व.

विमुक्तः मुच् धातु क्त प्रत्यय पुं. प्र. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

उप-एष्यसि प्राप्त होईल इ धातु कर्तरि लृट् लकार परस्मैपद म. पु. ए. व.

तुझी सर्व कर्मे मला अर्पण कर असे आधीच्या श्लोकात सांगून झाल्यावर त्या पासून मिळणारे लाभही सांगणे आलेच. कोणतेही कर्म हे दोषरहित नसते. जसे अग्नि पेटवल्यावर धूरामूळे प्रदूषण तर होणारच. अगदी आपण श्वास सोडला तरी हवेचे प्रदूषण होतेच. आपले रोजचे जेवण सुद्धा भाजी फळे झाडावरून तोडल्याशिवाय त्यांना चिरल्याशिवाय होऊ शकत नाही. म्हणजे कितीही प्रयत्न केला तरी कर्माचे दोष टाळता येत नाहीत. पण हि कर्मे भगवंतांना अर्पण केली की आपली जबाबदारी संपली. सर्व कर्मे जर भगवंतांना अर्पण केली तर त्याची फळे सुद्धा भगवंतांनाच प्राप्त होतील. अशी कर्मे अर्पण करणे हाच

संन्यासयोग. थोडक्यात आपली सर्व कर्मे आपण तारतम्य ठेवून केली पाहिजेत. पर्यावरणाचे संरक्षण करताना हाच तर मुद्दा कळीचा ठरतो. अध्यात्माच्या अंगाने विचार केला तरी हेच उत्तर येते, कोणतीही गोष्ट स्वतः च्या स्वार्थासाठी करू नका. कारण कोणतेही कर्म केले की त्याचे शुभ, अशुभ फळ मिळणार आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की अशा प्रकारे तू शुभ अशुभ कर्मांच्या बंधनांतून मुक्त होशील. असा संन्यासयोगाने युक्त होऊन तू मलाच प्राप्त होशील.

---

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः। ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्।।9.29।।**

अहम् सर्व-भूतेषु समः, न मे द्वेष्यः अस्ति न प्रियः, ये तु माम् भक्त्या भजन्ति, ते मयि, अहम् च अपि तेषु ।

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

सर्व-भूतेषु  सर्व जीव मात्रांवर सर्व-भूत नपुं. स. ब. व.

समः  सारखे सम पुं. प्र. ए. व.

न अव्यय

मे मला अस्मद् ष. ए. व.

द्वेष्यः अप्रिय द्वेष पुं. प्र. ए. व.

अस्ति आहे अस् धातू असणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

न अव्यय

प्रियः प्रिय पु. प्र. ए. व.

ये जो यद् पुं. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

भक्त्या भक्तीपूर्वक भक्ति स्त्री. तृ. ए. व.

भजन्ति भजतातभज् धातू भजणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

ते ते तद् पुं. प्र. ब. व.

मयि माझ्यात अस्मद् स. ए. व.

अहम् च  मी पण

अस्मद् प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अपि सुद्धा अव्यय

तेषु त्यांचा तद् स. ब. व.

जाती आणि धर्म निर्माण करून माणसांनी माणसांमध्ये भेदभाव निर्माण केले. स्वतःच्या बुद्धि च्या जोरावर इतर प्राण्यांना आपल्या ताब्यात ठेवले. पण निसर्ग मात्र असा भेदभाव करताना दिसत नाही. सूर्य एका वेळी सर्वांना सारखाच प्रकाश देतो. नदी सर्वांसाठी वहात असते. झाडे सर्वांना सावली देतात.

असेच काहीसे श्रीभगवानकृष्ण सुद्धा म्हणत आहेत.

मी सर्व प्राणिमात्रांसाठी समान आहे. कोणाबद्दल द्वेष नाही आणि कोणी मला प्रिय नाही. पण जे भक्ती भावाने मला पूजतात, ते माझ्यामध्ये सामावलेले असतात आणि मी त्यांच्या मध्ये असतो.

---

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्। साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः।।9.30।।**

चेत् सुदुराचारः भजते माम अनन्य भाकः अपि सः साधुः एव मन्तव्यः सम्यक व्यवसितः ही।

चेत् जरी अव्यय

सुदुराचारः पापी सुदुराचार पुं. प्र. ए. व.

भजते पूजतात भज् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

माम मला अस्मद् द्वि. ए. व.

अनन्य भाकः अनन्य साधारण भक्त

न अन्य भाज् पुं. प्र. ए. व.

अपि तरी अव्यय

सः तो तद् पुं. प्र. ए. व.

साधुः सज्जन साधु पुं. प्र. ए. व.

एव नक्की अव्यय

ही सुद्धा अव्यय

मन्तव्यः मानावा मन् धातु तव्यत प्रत्यय पुं. प्र. ए. व.

सम्यक चांगले अव्यय

व्यवसितः दृढनिश्चयी

वि+अव+सि धातू बांधून घेणे क्त प्रत्यय पुं. प्र. ए. व.

महर्षी व्यासांनी अतिशय महत्त्वाचा श्लोक सांगितला आहे,जे ज्ञानेश्वरांनी पसायदानात म्हटले आहे.

जे खळांची व्यंकटी सांडो |

त्या सत्कर्मी रती वाढो |

दुष्टांचा दुष्टपणा संपून जाऊदे. सर्वजण गुण्यागोविंदाने राहूदे.

वाट चुकलेल्या व्यक्तीला सुद्धा सन्मानाने आयुष्य जगता यावे जर त्याला आपल्या दुष्कर्माचा पश्चात्ताप झाला असेल तर.

ह्या श्लोकातील सुदुराचारी हा शब्द महत्त्वाचा. काही ठिकाणी महापापी असा अर्थ दिला आहे तर काही ठिकाणी दुर्जनातील सज्जन म्हणजे थोडीफार माणूसकी शिल्लक असलेला असे म्हटले आहे.

आपल्याला वाल्मीकि ऋषींची गोष्ट माहीत आहेच. वल्मीक म्हणजे वारूळ जे तपश्चर्या करताना ऋषींच्या भोवती निर्माण झाले, आणि म्हणून नाव पडले वाल्मिकी. त्यांचे खरे नाव रत्नाकर.

उलटा नाम जपत जग जाना। बाल्मीकि भए ब्रह्म समाना।। रामचरितमानस।।

म्हणजेच दुर्जनांना सुद्धा सुधारणा करण्याची संधी आहे.

जर एखादा पूर्णपणे परमेश्वराला शरण गेला आहे पण ज्याच्या कडून काही दुष्कर्मे घडली आहेत. त्यांना चंद्रावरच्या काळ्या डागाप्रमाणे मानले पाहिजे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जर कोणी दुराचारी अनन्य भावाने माझी भक्ती करत असेल तर त्याला साधू मानायला हरकत नाही कारण आता त्याने तसा निश्चयच केला आहे.

---

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति। कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति।।9.31।।**

क्षिप्रम् धर्म-आत्मा भवति, शश्वत् शान्तिम् निगच्छति, हे कौन्तेय! प्रतिजानीहि मे भक्तः न प्रणश्यति।

क्षिप्रम् ताबडतोब अव्यय

धर्म-आत्मा पवित्र आत्मा

धर्मन् आत्मन् पुं. प्र. ए. व.

भवति होतो भू धातू होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

शश्वत् अनंतकाळ अव्यय

श्व श्व इति

शान्तिम् शांति स्त्री. द्वि. ए. व.

निगच्छति मिळते नि+गच्छति गम् धातू जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

हे कौन्तेय!

प्रतिजानीहि घोषित कर

प्रति+ज्ञा धातू जाणणे कर्तरि लोट् लकारः परस्मै पदम् म. पु. ए. व.

मे माझे अस्मद् ष. ए. व.

भक्तः भक्त पुं. प्र. ए. व.

न प्रणश्यति नाश होत नाही

प्र +नश् धातू नाश होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकात क्षिप्रं ह्या शब्दाचा अर्थ ताबडतोब असा आहे, शिवाय ते एका नदीचे नाव सुद्धा आहे. आपल्या शरीरात असणाऱ्या 108 मर्म स्थळांपैकी एकाचे नाव क्षिप्रा. आधीच्या श्लोकातील अर्थाचा संदर्भ घेऊन (दुर्जन सुद्धा साधू होऊ शकतो) ह्या श्लोकाचा अर्थ लावायला हवा. दुराचारी माणसाला सुद्धा आयुष्य फक्त पुन्हा जगण्याची संधीच नाही तर शाश्वत शांती प्राप्त होऊ शकते, केवळ कठोर परिश्रम आणि दृढ निश्चय असायला हवा. सिद्धार्थ चा बुद्ध झाला. वाल्या कोळी चा वाल्मिकी झाला, हे आपल्याला माहीत आहे.

भक्ति: परेशानुभवो विरक्ति-

रन्यत्र चैष त्रिक एककाल: ।

प्रपद्यमानस्य यथाश्नत: स्यु-

स्तुष्टि: पुष्टि: क्षुदपायोऽनुघासम् ॥ श्रीमद्भागवतम् 11.2.42॥

जसे भोजन करताना तुष्टी, पुष्टी आणि क्षुधाशांती होते त्याप्रमाणे भगवंताच्या भक्ती मुळे परम आनंद, परमेश्वराचा अनुभव, वैराग्य यांचा लाभ होतो.

म्हणजेच परमेश्वराच्या भक्तीने सर्व दुर्गुण नष्ट होतात. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

तो (दृढनिश्चयाने भक्ती करणारा) लगेचच धर्माचे आचरण करणारा असा आत्मा होतो आणि त्याला शाश्वत अशी शांती प्राप्त होते. (आधीच्या दुष्कृत्यांमुळे, पश्चाताप होऊन योग्य अशा भक्ती मार्गावर वाटचाल सुरू आहे. ) हे कौन्तेय, माझ्या अशा भक्तांचे कधीही अधःपतन होत नाही हे नीट समजून घे.

---

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्।।9.32।।**

हे पार्थ! स्त्रियः वैश्याः शूद्राः तथा पाप-योनयः ये अपि स्युः ते अपि माम् व्यपाश्रित्य, पराम् गतिम् हि यान्ति।

हे पार्थ!

स्त्रियः स्त्री. प्र. ब. व.

वैश्याः वैश्य पुं. प्र. ब. व.

शूद्राः शूद्र पुं. प्र. ब. व.

तथा अव्यय

पाप-योनयः पाप योनि पुं. प्र. ब. व.

ये अपि ते सुद्धा

ये यद् पुं. प्र. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

स्युः असू शकते अस् धातू असणे कर्तरि विधीलिङः लकार परस्मैपद प्र. ब. व.

ते अपि ते सुद्धा

तद् पुं. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

व्यपाश्रित्य, शरण जाऊन

वि +अप +आङः +श्रि धातू सेवा करणे ल्यप प्रत्यय

पराम् गतिम् श्रेष्ठ स्थिति

परा स्त्री. द्वि. ए. व.

गतिम् गति स्त्री. द्वि. ए. व.

हि सुद्धा

यान्ति प्राप्त होतात

या धातू जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

परत एकदा ह्या श्लोकात सर्वांना म्हणजेच जे पूर्वी वाईट मार्गावरून चालत होते आणि ज्यांना त्याचा पश्चात्ताप झाला आहे अशा सर्वांना चांगले आयुष्य जगण्याचा अधिकार आहे असे सांगितले आहे.

किरातहूणान्ध्रपुलिन्दपुल्कशा आभीरशुम्भा यवना: खसादय: । येऽन्ये च पापा यदपाश्रयाश्रया:

शुध्यन्ति तस्मै प्रभविष्णवे नम: ॥ श्रीमद्भागवतम् 2.4.18॥

किरात-हूण आन्ध्र पुलिंद-पुलकशा अबीर-शुंभ यवन खसदाय इत्यादी समूह आणि इतर पापकर्मी सुद्धा भगवंतांना शरण येऊन पवित्र होऊ शकतात. आजच्या काळानुरूप ह्या श्लोकातील प्रत्येक शब्दाचा अर्थ सांगणे कठीण आहे. संपूर्ण गीतेत स्त्री आणि पुरुष असा भेदभाव केलेला नाही. आत्म्याचा उल्लेख लिंगानुरुप कुठेच केलेला नाही. हा श्लोक अपवादात्मक म्हणावा लागेल. शूद्र आणि वैश्य ह्या शब्दांचा अर्थ जातीयवादी न घेता कुकर्म करणारे असा घ्यायला हवा कारण आधीच्या श्लोकात तेच म्हटले आहे. प्रत्येकाला चांगले जीवन जगण्याचा अधिकार आहे असे आधीच स्पष्ट केले असल्याने सर्वांना भगवंतांच्या जवळ जाण्याचा अधिकार आहे असे म्हणता येईल.

विवेकिनो विरक्तस्य शमादिगुण शालिनः।

मुकुक्षोरैव हि ब्रह्मजिज्ञासायोग्यता मताः।। जगद्गुरु शंकराचार्यजीं नी म्हटल्याप्रमाणे ज्ञानयोगाचा मार्ग अनुसरणारी व्यक्ति हि विवेकी, विरक्त, संयमित मन आणि इन्द्रिय असणारी आणि मुमुक्षु म्हणजे मुक्तीची इच्छा असणारी अशी असली पाहिजे.

अष्टांगयोग, हठयोग यांच्या मार्गाने जाणाऱ्यांसाठी पण काही विशिष्ट पात्रता यम आणि नियम ह्या स्वरुपात सांगितल्या आहेत.

मात्र भक्ती पथावर चालण्यासाठी असे कोणतेही नियम नाहीत.

आनिन्द्ययोन्यधिक्रियते पारम्पर्यात् सामान्यवत्। (शाण्डिल्यभक्तिसूत्र 78)

शास्त्राप्रमाणे सर्व माणसांना भक्ती चा अधिकार आहे जसे इतर गोष्टींचा त्यांना अधिकार आहे.

ह्या श्लोकातील पाप-योनयः ह्या शब्दाचा अर्थ पूर्वजन्मीचा पापी असा घेतला आहे.

श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जे मला शरण येतात, मग ते समाजाच्या कोणत्याही स्तरावर असोत, स्त्री, वैश्य पापी, अगदी समाजाने बहिष्कृत केलेले असोत, ते (त्यांच्या भक्तीने) सर्वोच्च स्थान प्राप्त करू शकतात.

---

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा। अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्।।9.33।।**

किम् पुनः पुण्याः ब्राह्मणाः तथा भक्ताः राजर्षयः? असुखम् अनित्यम् इमम् लोकम् प्राप्य, माम् भजस्व।।

किम् काय? नपुं. प्र. ए. व.

पुनः अव्यय

पुण्याः पुण्य पुं. प्र. ब. व.

ब्राह्मणाः ब्राह्मण्य जाणणारा ब्राह्मण पुं. प्र. ब. व.

तथा आणि अव्यय

भक्ताः भक्त पुं. प्र. ब. व.

राजर्षयः राजाचा आश्रय असलेला राजन् ऋषि पुं. प्र. ब. व.

असुखम् सुख रहित न सुख पुं. द्वि. ए. व.

अनित्यम् क्षणिक अनित्य पुं. द्वि. ए. व.

इमम् हे इदम् पुं. द्वि. ए. व.

लोकम् जग लोक पुं. द्वि. ए. व.

प्राप्य, प्राप्त झालेले प्र+आप धातु ल्यप प्रत्यय

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

भजस्व पूजतात भज् धातु भजणे कर्तरि लोट लकार आत्मनेपद म. पु. ए. व.

आपण ज्या जगात राहतो आहोत ते कसे आहे? ह्याचे संक्षिप्त वर्णन अचानक वाचायला मिळते. असुखम् अनित्यम्. असे ते शब्द म्हणजे दुःखमय आणि क्षणिक. येथे मिथ्या हा शब्द वापरलेला नाही. मागील

अध्यायात मायावी जग असा उल्लेख आला आहे. म्हणजेच दुसरे असे जग सुद्धा अस्तित्वात आहे जे शाश्वत आहे, सुखदायक आहे. ह्याचा उल्लेख आधीच्या अध्यायांमधे आलेला आहे.

ब्राह्मणाचे गुणवत्तेनुसार आठ प्रकार आहेत जसे मात्र, ब्राह्मण, श्रोत्रिय, अनूचान, भ्रूण, ऋषिकल्प, ऋषि आणि मुनी. प्रत्येक श्रेणी मध्ये ज्ञान आत्मसात करण्याच्या निरनिराळ्या पायऱ्या आहेत. कालांतराने ब्राह्मण फक्त जातीपुरतेच उरले असे म्हणता येईल.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

(आधीच्या श्लोकांचा संदर्भ घेऊन) मग पुण्यवान, धर्म जाणणारे, भक्त, राजर्षी (ह्यांच्या बद्दल काय बोलायचे?) म्हणून ह्या क्षणिक दुःखमय जग प्राप्त झालेल्या (तू) माझी भक्ती कर.

---

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु। मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः।।9.34।।**

मत्-मनाः मत्-भक्तः मत्-याजी भव, माम् नमस्कुरु एवम् आत्मानम् युक्त्वा मत्-परायणः माम् एव एष्यसि ।।

मत्-मनाः माझ्या सारखे विचार अस्मद् मनस् पुं. प्र. ए. व.

मत अस्मद् पंचमी एकवचन येथे मत ह्या शब्दाचा अर्थ माझ्यासारखे असा घेता येईल.

मत्-भक्तः माझा भक्त

भक्त पुं. प्र. ए. व.

मत्-याजी मला पूजणारा याजिन पुं. प्र. ए. व. यज् धातू म्हणजे यज्ञ करणे

भव हो भू धातु कर्तरि लोट लकार परस्मैपद म. पु. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

नमस्कुरु प्रणाम कर नमस् +कृ धातू नम् धातू वाकणे कर्तरि लोट लकार उभयपदी म. पु. ए. व.

एवम् म्हणून अव्यय

आत्मानम् आत्म्याला आत्मन् पुं. द्वि. ए. व.

युक्त्वा नियुक्त करून युज् धातू संयम ठेवणे, स्थिर असणे क्त्वा प्रत्यय

मत्-परायणः मी हेच अंतिम लक्ष्य परायण पुं. प्र. ए. व.

माम् एव माझ्याच कडे

अस्मद् द्वि. ए. व.

एव नक्की अव्यय

एष्यसि जाशील इ धातू जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद म. पु. ए. व.

आपले मन नेहमीच शंकाकूल असते. मात्र एखादा संकल्पाचा ध्यास घेऊन, दृढ निश्चयाने कार्य केल्यास निश्चित यश मिळू शकते. असेच काहीसे ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी सांगितले आहे.

अयं हि सर्वकल्पानां सध्रीचिनो मतो मम।

मद्भव: सर्वभूतेषु मनोवाक्कयवृत्तिभि: ॥श्रीमद्भागवतम् 11. 29. 19 ॥

वास्तविक मन, वाणी आणि शरीरा-द्वारे कार्य चालू असताना सर्वांच्या मनात माझाच विचार असण्याने कार्य संपन्न होतात."

ह्या अध्यायातील पहिल्या श्लोकाची सुरवात मी (श्रीभगवानकृष्ण) तुला राजविद्या सांगतो अशी करून ते विशेष ज्ञान जाणून घेतल्यानंतर तुला ह्या अशुभ संसारातून मुक्ती मिळेल असे म्हटले. त्यानंतर ह्या जगाची निर्मिती आणि परमेश्वराचे सर्वत्र असलेले अस्तित्व सांगून झाल्यावर, ह्या लोकांत राहणाऱ्या विविध प्रवृत्ती च्या व्यक्ती आणि त्यांना असणारा भक्तीचा समान अधिकार ह्या बद्दल विवेचन सापडते. आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे हे जग अनित्य आणि दुःखमय असून, दुसरे जग जे शाश्वत आणि सुखदायक आहे, ते प्राप्त करण्यासाठी परमेश्वराला शरण जाण्याशिवाय पर्याय नाही असे म्हटले.

त्यासाठी कृष्णाची अखंड भक्ती करत रहावे. कृष्ण सतत आपल्या मनात असायला हवा म्हणजे कसे?

भगवंतांनी त्यांच्या स्वतःच्या कर्तव्यांबददल सुद्धा भाष्य केले आहेच.

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।

धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।।4.8।।

आपल्याला सुद्धा भगवंतांच्या ह्या कार्यात सहभागी होता येईल.

नवविधा भक्ती च्या शेवटच्या तीन प्रकारात दास्य भक्ती, सख्य भक्ती आणि आत्मनिवेदन भक्ती असे प्रकार सांगितले आहेत.

भगवंताचे दास व्हायचे म्हणजेच भगवंताच्या कामाची जबाबदारी आपण घ्यायची. सख्य भक्ती हि पुढची पायरी. प्रत्येक गोष्टीत आधी 'तो' आणि मग 'मी' हा भाव नित्य जागृत ठेवणे म्हणजे सख्यभक्ती. आपण जे भगवंताच्या कार्यात हातभार लावणार आहोत ते सर्व त्यालाच अर्पण करायचे म्हणजे आत्मनिवेदन भक्ती.

म्हणून शेवटच्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

तुझे मन माझ्यासारखे होऊदे. तू माझा भक्त हो. माझाच यज्ञ तू कर. मला नमस्कार कर. सतत माझेच चिंतन करून 'मी ' हेच अंतिम लक्ष्य असू दे. असे सर्व करून तू मला प्राप्त होशील.

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः।।

याप्रमाणे श्रीमद्भगवद्गीतारूपी उपनिषदातील ब्रह्मविद्या आणि योगशास्त्र याविषयी श्रीभगवानकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादातील राजविद्याराजगुह्ययोग नावाचा नववा अध्याय समाप्त झाला.

--------------------------------------------🙏🙏🙏🙏---------------------------------------------------